# बाल शिवाजी

[ संगीत – अंक ३ ]

लेखक

गो. रा. शिरगोपीकर

रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई ४

ऑक्टोबर ४२

किंमत १। रु.

# प्रास्ताविक

वंदनीय व्यक्तींच्या बाललीला पहाण्याकडे, बहुजन समाजाच्या मनाची ओढ, 'गोकुळचा चोर' नाटकावरून चांगलीच दिसून आली, व त्यामुळेंच आघ्या महाराष्ट्रास वंदनीय असलेल्या श्री शिवाजीमहाराजांच्या बाललीलेंतील प्रसंग, नाटकासाठीं मीं निवडला आहे.

कुटुंबांतील माणसें एकत्र बसून प्रयोग पहात असतां, एकमेकांत संकोच न होण्याचें ध्येय व बालभूमिकेच्या उठावाची नाट्यरचना, असें पुढें ठेवून हें नाटक बाल-नटनटींच्या आनंद संगीत मंडळीसाठीं लिहिलें आहे.

नाटक म्हणजे इतिहास नव्हे, तरीपण नाटकांतील प्रसंग इतिहासाच्या सत्य निकषावर घांसून मिळतें करून घेण्याचा मीं प्रयत्न केला आहे. या कामांत श्री० साधूदास मुजुमदार यांनीं मला अमोल मदत केली याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहें.

रंगभूमीवर न दाखवितां येणारे प्रसंग दाखवून कथासूत्र जोडण्यासाठीं ठिकठिकाणीं चित्रपटाची मदत घेतली आहे.

आतांपर्यंत होत असलेल्या प्रयोगावरून हें नाटक यशस्वी झाल्याचा कौल जनताजनार्दनाकडून मिळत आहे याबद्दल रसिक जनतेचा मी ऋणी आहें.

कागदाची दुर्मिळता व महर्घता असतां मनावर घेऊन पुस्तक प्रकाशन केल्याबद्दल श्री. सापळे यांचा आभारी आहे.

या नाटकाचा प्रथम प्रयोग ता. ३१।१०।४२ रोजीं कोल्हापूर येथील पद्मा टॉकीजमध्यें झाला.

रसिकांचा नम्र,

**गो. रा. शिरगोपीकर**

# १

[ १ ]

— **स्थळ** : रोहिडेश्वराचें मंदीर–पहाटेचा चौघडा सुरू आहे —

**सईबाई** : [ कलगी नांवाच्या दासीसह येते ]

उठि लौकर सांबहरा ॥ घे झणिं अवतारा ॥ ध्रु० ॥
नाहीं कारे सरली रात ॥ कां न दिनमणी उगवत ॥
तिमिरचि कां हा अनंत ॥ ये करि परिहारा ॥ उठि...॥ १ ॥

कलगी, रोज मनोभावानं इतकी करुणा भाकते, तरी अजून देवाला नाहीं का ग दया येत. पापाचा भार हलका करण्यासाठीं, प्रभुराया अवतार घेत असतो असें म्हणतात, तेव्हां ती वेळ अजून नाहीं का ग आली ?

**कलगी** : ताईसाहेब, देवाच्या करणीचा कुणाला कधीं ठाव लागला आहे का ? मी म्हणतें, त्यानं अवतार घेतला नसेल असं तरी कशावरून म्हणतां ?

**सईबाई** : माझा प्रभू अवतार घेतां तर, त्याचा प्रभाव केव्हांच दिसतां. सुवासिक फुलं उमललीं हें कुणाला सांगावं का लागतं ? ती गोष्ट छपून का राहणारी आहे ?

**कलगी** : ताईसाहेब, तुम्ही कांहीं म्हणा, मनोभावानं चाललेल्या तुमच्या आळवणुकीचं फळ मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. या रामपाऱ्यांत माझं मन

मला सांगतं कीं, तो सोन्याचा दिवस लौकरच उगवून, बंदिवासांत पडलेल्या तुमच्या बाबांची सुटका झाल्याशिवाय राहणार नाहीं, याची खात्री ठेवा.

**सईबाई** : तें खरं ग, पण तो सोन्याचा दिवस उगवण्यापूर्वी पारतंत्र्याच्या अंधारकोठडींत मला जन्मठेपेची शिक्षा मिळणार त्याची काय वाट?

**कलगी** : खरंच ताईसाहेब, मी विचारीन विचारीन म्हणते, कीं बादशाहाजवळ चुगली करून तुमच्या बाबासाहेबांच्या बंदिवासाला कारण झालेले मोहितेच पुन्हां तुम्हाला कशी मागणी घालतात? मेलं ऐकावं तें एकेक नवलच.

**सईबाई** : त्यांनीं पूर्वी एकदां मागणी घातली होती. त्या वेळीं तुमच्यासारख्या अभिमानशून्य माणसाच्या घरीं माझी मुलगी द्यायची नाहीं, असं साफ सांगून बाबांनीं त्यांना वाटेला लावलं. तेव्हांपासून ते मेले लोचट आमचे पाठीमागें कसें हात धुऊन लागले आहेत.

**कलगी** : तरीच म्हटलं, इतक्या दूर अशा दरीखोऱ्यांत, जातगोत नसलेल्या ठिकाणीं बाबासाहेबांनीं तुम्हाला कां आणून ठेवलं?

**सईबाई** : अग जातगोतींत काय आहे. तुमच्या नरसप्रभूच्या घराण्याचा आणि आमच्या घराण्याचा जिव्हाळा रक्तामांसाहून अधिक आहे, ठाऊक नाहीं का तुला? आणि म्हणून तर मला बाबांनीं इथं आणून ठेवलं. पण माझं दैवच कसं हात धुऊन पाठीस लागलं आहे पहा. मी इथं येऊन पांचसहा महिने लोटतात न लोटतात तोंच त्यांचा अंत कां व्हावा, आणि त्यांचा मुलगा दादा पोरका कां व्हावा? माझ्या अदृष्टांत काय लिहिलं आहे हेंच कळत नाहीं!

**कलगी** : पण ताईसाहेब, दादासाहेबांचं सख्या बहिणीप्रमाणं तुमच्यावर प्रेम आहेच ना?

**सईबाई** : होय, त्यांतलें त्यांत समाधान मानण्यासारखी काय ती एवढीच जागा आहे. माझ्यासाठीं बिचाऱ्याचा जीव कसा तिळतीळ तुटतो आहे. पण–फाटलेल्या अभाळाला तो तरी किती ठिगळं लावील? त्यांत मी आणि असंहि ऐकतें आहे कीं, मी इथं आहे असा सुगावा लागतांच त्या मेल्या मोहित्यांनीं या प्रांताच्या बंदोबस्ताची कामगिरी बादशाहाकडून मागून घेतली आहे.

**कलगी** : तरीच म्हटलं तुमच्या मागणीसाठीं एवढं तोऱ्याचं पत्र दादासाहेबांना कसं आलं? मेले आजच येणार आहेत म्हणे!

**सईबाई :** होय ! आतां या प्रसंगांतून मी कशी पार पडणार देव जाणें ! माझा सगळा भार शंभुरायावर आहे. जा—बेलपत्री घेऊन ये. सूर्योदयापूर्वी पूजा झाली पाहिजे.

**कलगी :** [जाऊं लागते. वाटेंत झोपलेल्या पिराजीस पाहून] अगबाई ! इथं कोण घोरत पडलं आहे ?

**सईबाई :** असेल कोणी तरी निशाचरी ! ढळढळीत उजाडून चांगले चटके बसल्याशिवाय असल्यांच्या झोपा उडायच्या नाहींत.

उठि लौकर सांबहरा । घे झणिं अवतारा ॥ ध्रु० ॥
द्विजगण हा वाट बघत । दुंदुभिरव सादवीत ॥
बघसि किती आतां अंत । अन्य न मज थारा ॥ २ ॥

[सईबाई गाभाऱ्यांत जाते.

**पिराजी :** [जागा होऊन] काय करावं, थोडी सुखानं झोंप घेईन म्हणतों पण या देवाच्या घंटा झोप घेऊन देतील तेव्हां ना ? सारख्या ठणठणताहेत ! [फुलें घेऊन येत असलेल्या कलगीस पाहून] अरे, पण ही कोण बरं येत आहे ? घुंगूर आहे कीं गजघंटा आहे ?

**कलगी :** [प्रवेश करून] काय हो—म्हटलं झाली का झोप ?

**पिराजी :** झाली कसली, तुम्हीच तिला घालविली.

**कलगी :** बरं, पण—तुम्ही कोणत्या गांवचे आणि कुठं निघालांत ?

**पिराजी :** आम्ही होय ?...आम्ही आमच्याच गांवचे आहोंत. आणि या तुमच्या गांवांतील आमचं काम झालं म्हणजे आम्ही आमच्या गांवाला परत जाणार आहोंत. समजलं ?

**कलगी :** काय ? आमच्या गांवांत तुमचं काम आहे ? कुणाकडं आहे बरं तुमचं काम ?

**पिराजी :** हें बघा—तुम्ही थोडं मनावर घ्याल तर तुमच्याकडंही माझं काम होईल.

**कलगी :** माझ्याकडं ?—आणि तुमचं काम ? तें काय ?

**पिराजी :** तें मग सांगीन्; पण मी तुम्हाला असं विचारतों कीं, या गांवच्या तरण्याताठ्या पोरी घरांतलं काम सोडून रामपारीं देवळंन् देवळं कां धुंडताहेत ?

**कलगी :** देवळांत कशाला यायचं ?—देवासाठीं.

**पिराजी :** मग, अजून त्यांचा देव कांहीं सांपडत नाहीं वाटतं. हें बघा, मनांत आणलं तर तो देव कांहीं दूर नाहीं. पण भक्ताला थोडं उमगायला पाहिजे.

**कलगी :** हें पहा, कोणत्या देवाची कशी पूजा करायची हें आम्हांला चांगलं समजतं, बरं का !

**पिराजी :** होय का ! एकूण सुपं सोडून इतक्या दूर आल्याचं या पिराजीरावाचं सार्थक झालं असं म्हणायला कांहीं हरकत नाहीं !

**कलगी :** काय ? तुम्ही सुपें गांवचे ?...मग मी तुम्हाला थोडी माहिती विचारते, सांगाल का ?

**पिराजी :** वाटेल तें विचारा, खडान् खडा माहिती देतों. तुम्हाला काय वाटलं, हा खुंटावरचा कावळा आहे होय ? माझी जिंदगी बघाल तर डोळेच फिरतील. गुराढोरानं तर नुसतं घर भरलं आहे. शिवाय दाणा, गोटा, वैरण, पाणी...

**कलगी :** तें तुमचं राहूं दे; मी तुम्हांला विचारतें कीं, या तुमच्या सुप्याचे मोहितेसाहेब या गांवाला सोयरिक जमवायला येणार होते ते केव्हां येणार आहेत, हें ठाऊक आहे का तुम्हांला ?

**पिराजी :** येणार कसले, आलेसुद्धां आहेत. त्यांच्याबद्दल काय विचारायचं असलं तर हळू विचारा; नाहीं तर त्यांना ऐकूं जाईल. ते तिथं आंत झोपले आहेत. मी त्यांच्याच पदरचा म्हणून त्यांच्याबरोबर आलों आहे, समजलं ?

**कलगी :** पण हे असे देवळांत काय म्हणून उतरले आहेत ?

**पिराजी :** नवरी मुलगी ज्या घरांत आहे तिथं उतरायचं नाहीं, असा धाकट्या धन्यांनीं हट्ट धरल्यामुळं इथं उतरावं लागलं.

**कलगी :** आणि हे धाकटे धनी कोण ?

**पिराजी :** अहो, खुद्द नवरदेव. बाजीसाहेब मोहित्यांचा मुलगा लाडोजीराव. आतां तरी समजलं ? पण तुम्ही कोण, कुठल्या हें नाही सांगितलंत्.

**कलगी :** मी होय ? तुम्ही पहायला येणार ती नवरी ज्या घरांत आहे त्या घरच्या मालकांच्या पदरची आहे मी.

**पिराजी :** अर्रर्रर्र ! आमचं तुमचं नातं अगदीं जवळ येत चाललं कीं ! मी नवऱ्याकडचा आणि तुम्ही नवरीकडच्या—बरोबर जमलं, आणि जमणारच. कारण आज उठल्याबरोबर तुमचं तोंड पाहिलं आहे.

**कलगी** : हें पहा, आतां तोंडाची टकळी थोडी बंद ठेवा. आणि देवदर्शनासाठीं येत असलेल्या आमच्या दादासाहेबांच्या कानावर ही गोष्ट घाला. ते पहा आलेच.

[ कलगी गाभाऱ्यांत जाऊं लागते....दादाजी प्रभू प्रवेश करतात.

**पिराजी** : देशपांडेसाहेब, जोहार करतो.

**दादाजी प्रभू** : कोण रे तूं ? रामराम न करतां जोहार करतो आहेस तेव्हां तूं आमच्या प्रांतांतला दिसत नाहींस ?

**पिराजी** : निंबाळकरांच्या ताईसाहेबांना पहायला येणाऱ्या मोहितेसाहेबांच्या पदरचा मी आहें.

**दादाजी** : अरे पण मोहितेसाहेब येणार होते ना ?

**पिराजी** : येणार होते कसले—आलेसुद्धां आहेत. इथं आंत आहेत.

**दादाजी** : होय का; मी आल्याची वर्दी दे पाहूं. [ कलगी जाते.

**बा. मोहिते** : [ आंतून ] कायरे, काय गडबड चालली आहे.

**पिराजी** : गडबड—बिडबड कांहीं नाहीं धनीसाहेब, रोहिड्याचे देशपांडेसाहेब आपल्या भेटीला आले आहेत.

**दादाजी** : [ मोहिते आल्याचें पाहून ] रामराम म्हटलं मामासाहेब.

**बा. मोहिते** : काय—राम राम ?

**पिराजी** : धनीसाहेब, तुम्हाला ठाऊक नाहीं का, शिवाजीच्या टोळक्यांतील ही मंडळी जोहाराऐवजीं रामराम म्हणत असतात.

**बा. मोहिते** : बरी वेळेवर गोष्ट निघाली. हें पहा पंत, तुम्ही या खोऱ्याचे बहुत दिवसाचे, पातशाहीचे इनामदार नोकर, तेव्हां भलत्यासलत्याच्या नादीं लागून, वतनवाडीस धक्का लावून घेऊं नका—एवढंच तूर्त सांगणं आहे.

**दादाजी** : मामासाहेब, असं काय बोलतां ? आम्हीं काय केलं नि अपराध तरी काय सांगा.

**बा. मोहिते** : अपराध ? एक का दोन ? शिवाजीच्या नादानं या खोऱ्यांत पातशाहीविरुद्ध जमाव करून, पुंडावा सुरू केला आहे; आणि त्या आगींत तेल ओतण्यासाठींच, बादशहाची इतराजी होऊन कैदेंत पडलेल्या त्या निंबाळकराच्या मुलीला तुम्हीं आश्रय दिला; आणि याच तुमच्या उपद्व्यापामुळं, बादशाही हुकमानं बंदोबस्तासाठीं मला इकडं यावं लागलं. एकंदरींत समजलं ना ?

**दादाजी** : मामासाहेब, आमच्या वडलांचा नि निंबाळकरांचा फार घरोबा होता; म्हणूनच संकटसमयीं सईताईला आमच्याकडं पाठविली, प्रसंग जाणून आम्हीं ठेवून घेतली. आप्तइष्टांना संकटकाळीं मदत करायची नाहीं तर केव्हां करायची, मामासाहेब ? तुम्हीच सांगा, अशा वेळीं आम्हीं कसं वागावं ?

**बा. मोहिते** : बरोबर बोललांत. कसं वागावं हें तुम्हाला सांगत जाईन—त्याप्रमाणें वागलांत म्हणजे बादशहाच्या रागाला बळी पडण्याची भीति तर नाहींच, पण उलट तुमचं कल्याणच होईल. हें पहा, या बाबतींत योजना ठरवूनच, सईबाईच्या सोयरिकीबद्दल तुम्हाला तें पत्र पाठवलं—त्यांत त्या मुलीचं कल्याणही होईल आणि तुमचाहि धोका टळेल.

**दादाजी** : विश्वासानं आमच्याकडं येऊन राहिलेल्या माझ्या ताईचं कल्याण होईल तर मी आपल्या बाहेर का आहे ?...पण थोडा उलगडा झाल्यास बरं होईल म्हणतों.

**बा. मोहिते** : चोरून कशाला ठेवूं ? अहो, तुमच्या त्या सईबाईचे वडील आतां बंदींतून सुटण्याची आशाच नाहीं. त्यांची जप्त केलेली जहागीर मुलीच्या नांवें चालविण्याबद्दल, मोठ्या सायासानं बादशहाकडून मीं हुकूम मिळविला आहे. आणि बंदोबस्ताची कामगिरी घेऊन मी इकडं आलों आहे. एकंदरींत धोरण समजलं ना ?

**दादाजी** : बरं तें राहूं दे, मामासाहेब. त्याबद्दल मग बोलूं. पण आपण आमचे-कडे न येतां असें देवळांत कां उतरला ?

**बा. मोहिते** : तुमच्या घरींच उतरणार होतों; पण नवरी असलेल्या घरीं उतरा-यचं नाहीं असा बाळानं हट्ट धरल्यामुळं इथं उतरावं लागलं.

**दादाजी** : काय ? नवरदेवांनाहि बरोबर आणलं आहे वाटतं.

**बा. मोहिते** : होय. ज्याचं माणूस त्याच्या नजरेखालून गेलं म्हणजे आपलं बरं.

**लाडोजी** : [ डोळे चोळीत प्रवेश करतो ] आमचं सुपं सोडून इतक्या दूर येण्याची कुठली अवदसा आठवली कुणास ठाऊक ! प्रवासानं अंग कसं अगदीं ठणकायला लागलं आहे !

**दादाजी** : रामराम म्हटलं साहेब.

**लाडोजी** : बाबा, कोण हो हे रामराम म्हणणारे ?

**बा. मोहिते** : अरे, ज्याच्याकडं तुझी भावी पत्नी आहे ते हे या रोहिड्याचे दादाजी प्रभू ;–देशपांडे.

**पिराजी** : अहो धनीसाहेब, हे एक प्रकारें तुमचे मेहुणे लागतात.

**लाडोजी** : बाबा, मेहुणा म्हणजे अर्धी बायको म्हणतात, नाहीं का ?

**पिराजी** : अहो पंत, वाईट वाटून घेऊं नका. त्यांनीं तुमची थट्टा करायची नाहीं तर–करायची कुणी ?

**लाडोजी** : काय सांगूं ! अंगांतलीं हाडं कशीं पिंजायला लागलीं आहेत.

**दादाजी** : एकंदरींत आपणाला बराच त्रास झाला म्हणायचा ?

**लाडोजी** : त्रास ! त्रास म्हणून काय विचारतां ? या पिढीजाद इनामदार बच्चानं केलेल्या आजच्या प्रवासाइतका प्रवास, आमच्या सात पिढ्यांतहि कुणी केला नसेल. आठआठ दिवस एका जागेवर बसून झोपा काढणाऱ्या, या जातिवंत इनामदार बच्याला काय यातना होत असतील याची कुणाला काय कल्पना येणार ?

**बा. मोहिते** : पंत, तुम्हींच सांगा,–कष्टाशिवाय का फळ मिळतं ?

**लाडोजी** : मी म्हणतों, आम्हा इनामदार बच्याला कष्ट करायला सांगणाऱ्या बापाच्या बापजाद्यांना कांहीं दुसरं काम होतं कीं काय ?

**दादाजी** : अहो, त्यांनीं कष्ट केले म्हणूनच आज आपण जहागीर उपभोगतां ना ?

**बा. मोहिते** : त्याची याला काय कल्पना ? अरे शाहण्या, ही जहागीर राखण्या-साठीं आमच्या पूर्वजांचे किती तरी देह खर्ची पडले आहेत तेव्हां कुठं ही जहागीर राहिली.

**लाडोजी** : मेले म्हणून कांहीं उपकार नाहीं केले. आपल्या वंशजासाठीं जहागीर राखून ठेवणं त्यांचं कामच होतं. मी म्हणतों, त्या वेळीं आणखी चार जहागिरी जास्त मिळवून ठेवल्या असत्या तर असं इकडं येण्याचं कारणंच पडलं नसतं. काय बेट्यांना काम होतं, कुणाला ठाऊक.

**दादाजी** : अहो–साहेब, चांगले पराक्रम गाजविल्याशिवाय जहागीर मिळत नसते.

**लाडोजी** : मी काय कमी पराक्रमी आहे असं समजतां ? एवढा मोठा प्रवास करून इथं आलों, जहागिरीसाठीं लग्नसुद्धां करून घ्यायला तयार झालों, आणखी पराक्रम तरी कोणता करूं म्हणतां ?

**बा. मोहिते** : काय पराक्रम करशील तें दिसेलच म्हणा. पिराजी, चल थोडा फेरफटका मारून सरकारी पाहणी करून येऊं. पंत, मुलगी पहावयाला बहुत करून आजच येऊं. आमच्या येण्याची पुढें वर्दी पाठवीनच. बाळ, तूंहि चल आमच्याबरोबर; म्हणजे तुलाहि थोडी कामकाजाची माहिती होईल.

**लाडोजी** : बाबा, मी येईन. पण यांच्या वाड्यावरून नाहीं जायचं. कारण तिथं माझी बायको असेल,...आणि ती मला बघील.

**पिराजी** : धनीसाहेब, आणि बघितलं म्हणून काय झालं ?

**लाडोजी** : नाहीं. तिनं आम्हांला बघायचं नाहीं. आम्ही तिला बघायला...

**पिराजी** : बरं दुसऱ्या वाटेनं जाऊं, मग तर झालं ?

**बा. मोहिते** : दादाजी, तुम्हीही आमचेबरोबर चला. आणि मी विचारीन ती माहिती बरोबर घ्या. विजापुरास आजच सांडणीस्वार रवाना करायचा आहे.
[ सर्व जातात.

**सईबाई** : [ कलगीसह प्रवेश करून ] कलगी, मला पहायला येणाऱ्या मंडळींचीं कारस्थानं ऐकलीस ना ?

**कलगी** : तें ऐकून माझं मन कसं गोंधळून गेलं आहे. आतां आमचा सर्व भार त्या शंभुरायावरच आहे.

**सईबाई** : मी तर त्या शंभुरायावरच भार ठेवून आहे. त्याला केव्हां दया येईल तेव्हां येईल.

**कलगी** : ताईसाहेब, अशा हताश कां होता ? पापाचा भार हलका होण्यासाठीं प्रभुराया योग्य वेळीं अवतार घेत असतो, ठाऊक नाहीं का तुम्हांला ?

दीन अनाथा जो जगीं या उद्धारीं ।
दुष्ट जनां परी गमतचि वैरी । तो माझा गिरीधारी ॥ धृ० ॥
दुष्ट कलि हा नष्ट कराया, अवतरला हा प्रभु या समया ॥१॥

[ शिवाजीची सावट सह्याद्रीचे माथ्यावर दिसते.

[ २ ]

— स्थळ—दादाजी प्रभूच्या वाड्याची देवडी —

**तुराजी :** [ पहारा करीत असतां कलगी येते ] कलगी, आज सकाळपासून तुझे सारखे हेलपाटे आणि येरझाऱ्या चालल्या आहेत कशासाठीं ? आणि येवढी आज घाई कसली चालली आहे ?

**कलगी :** घाई ? अहो—लगीनघाई.

**तुराजी :** हो बरोबर आहे. लग्नाची वेळ आली म्हणजे गजगतीनें चालणाऱ्या बायका हरिणीसारख्या धांवूं लागतात, असं म्हणतात तें अगदीं खरं.

**कलगी :** आणि पुरुष शुंभासारखे स्वस्थ बसतात, असंच ना आपलं म्हणणं ?

**तुराजी :** छट् ! पुरुष आणि स्वस्थ बसतील—शक्य नाहीं. लग्नास तयार असलेल्या बायकांच्या पाठीमागें वाऱ्यासारखे धांवत सुटतील, समजलीस ! बरं तें जाऊं दे, आपल्या बाशिंगाचा बार केव्हां उडवायचा ?

**कलगी :** पुन्हां पुन्हां काय विचारायचं ! ताईसाहेबांचं लग्न झाल्याशिवाय आपलं लग्न करायचं नाहीं, असं आपलं ठरलेलं लक्षांत नाहीं वाटतं.

**तुराजी :** मग ताईसाहेबांसाठीं पाहुणे मंडळी आली आहेत ना ?

**कलगी :** अहो ती पाहुणे मंडळी ताईसाहेबांसाठीं आली नाहींत—लग्नाचं नांव आणि जहागिरीचं गांव उपटण्यासाठीं आलीं आहेत, समजलं. त्यांचीं कारस्थानं ऐकून मी तर अगदीं थक्क झालें. मालकापासून नोकरापर्यंत मेले एका माळेचे मणी दिसतात. हा पहा त्या माळेंतील बजरबट्टू इकडे येतो आहे. मंडळी आल्याची वर्दी देऊन या, तोंपर्यंत याचा थोडा समाचार घेते.

[ कलगी— दूरवर पाहते.

**पिराजी :** [ प्र. क. ] बघायला आलेलीं माणसं डोळ्यासमोर असतां माणसाची नजर अशी दुसरीकडं कां ?

**कलगी :** दिसतं तसं नसतं म्हणून.

**पिराजी :** छे छे ! दिसतं तिथं कांहीं तरी असतं, म्हणून तर माणसाचं मन धांव घेतं.

**कलगी :** पण दिसतं तसं नसतं, हाच अनुभव येऊन शेवटीं फसतं, हें लक्षांत ठेवा.

**पिराजी** : आपणहि म्हटलं खूप समजून असावं कीं, फसणारे फसतील–पण आमच्यासारखीं माणसं फसविणारालाच फसवितील.

**कलगी** : एकंदरींत या कलेंतहि आपण तरबेज आहांत म्हणायचे. लौकर कळलं ठीक झालं. आतां आम्हांला पावलोपावलीं अगदीं जपूनच वागलं पाहिजे म्हणायचं. नाहीं तर—

**पिराजी** : नाहीं तर काय ? चुकून वाकडं पाऊल पडेल म्हणतां कीं काय ? पण बायकांच्या विचाराला विचारतो कोण. त्यांनीं फक्त घातलेलं खावं, दिलेलं नेसावं, सांगितलेलं करावं–येवढंच त्यांचं काम.

**कलगी** : म्हणजे जिथं जन्म काढायचा अशा लग्नाच्या बाबतींतहि आम्हांला बिल्कूल बोलतां यायचं नाहीं म्हणतां कीं काय ?

**पिराजी** : होय. बायकांनीं लग्नाच्या बाबतींत बिलकूल तोंड उघडायचं नाहीं. फक्त खालीं मान घालून गुपचूप बसलं पाहिजे.

**कलगी** : आणि बायकांनीं नाहीं ऐकलं तर काय कराल ?

**पिराजी** : काय कराल ?–तेंच दाखवायला आम्ही इथं आलों आहों. समजा, तुमच्या ताईसाहेब या सोयरिकीला कबूल नसल्या म्हणून आमचे धनीसाहेब लग्न केल्याशिवाय थोडेच परत जाणार आहेत ? आणि धनी तसा चाकर असायचाच.

**कलगी** : एकंदरींत बळी तो कानपिळी होऊन जुलमाचा रामराम करायला लावणार म्हणायचे. मग या असल्या लग्नानं आमच्या ताईसाहेबांना काय सूख मिळणार आहे हें उघडच दिसतंय् ?

**पिराजी** : एकंदरींत बायकांना धोरण कमी हेंच खरं. अहो, त्यांच्या सुखाकरतां का हें लग्न आहे, असं समजतां ? जहागिरीचं घबाड मिळविण्यासाठीं आमच्या धन्याची ही खटपट आहे–येवढंहि समजूं नये तुम्हांला ?

**कलगी** : म्हणजे, मनगटाचे जोरावर जहागिरी मिळविण्याचं सोडून तुमचे धनीसाहेब बायकांच्या नांवावर जहागिरी उपटण्याच्या खटपटींत आहेत म्हणायचे ?

**पिराजी** : हें पहा—तुम्हाला ठाऊक नाहीं. बायका काय–छप्पन मिळतील; पण जहागीर मिळायची नाहीं. अन् बायका फार तर ज्याच्या त्याच्या जन्मापुरत्या, पण जहागीर पिढ्यान्‌पिढ्या चालते ! हें लग्न तर उरकूं दे, तुमच्या खटपटीनं हें सारं झालं असं सांगून तुमच्या नांवावर धनीसाहेबाकडून एखादा गांव इनाम उपटल्याशिवाय सोडणार नाहीं—आहांत कुठं ?

**कलगी** : म्हणजे, ताईसाहेबांच्या नांवावर तुमचे मालक जहागीर उपटणार, आणि त्या जहागिरींतून तुम्ही माझ्या नांवावर एखादा गांव उपटून चोरावर मोर होणार म्हणायचे !

**तुराजी** : [ प्र. क. ] काय कलगी, चोरावर मोर कोण होणार आहे म्हणतेस ?

**पिराजी** : जाऊं द्या हो तें. बरं पण काय हो,...वर्दी देऊन आलांत काय ?

**तुराजी** : होय. आमचे धनीसाहेब त्यांच्या येण्याचीच वाट पहात आहेत.

**पिराजी** : पाहणारच. कां नाहीं पाहणार ? कारण...असं थोरामोठ्यांचं स्थळ आपल्या पायानं घरीं चालून येत आहे. एकंदरींत इथल्या बायकांचं नशीब थोर असं म्हणायला हरकत नाहीं. बरं–पण, काय हो तुराजीराव, तुमचं लग्न झालं आहे का ?

**तुराजी** : हें बघा. माझं लग्न झालेलं नाहीं, ठरलेलं मात्र आहे.

**पिराजी** : अहो, ठरवून लांबणीवर टाकण्यासारखी ही लग्नाची बाब नाहीं. अगदीं घाईत घाई करून लगीन घाईचं कार्य उरकलं पाहिजे. आणि जर का या कामांत थोडी दिरंगाई झाली तर लग्नाक्षताऐवजीं वाटाण्याच्या अक्षता मिळायच्याच म्हणून समजा.

**तुराजी** : मी म्हणतों मागला पुढचा विचार न करतां, अशा घाईनं कार्य उरकणं म्हणजे अंधारांत मिठी मारण्यासारखं नव्हे का ?

**पिराजी** : आतां काय सांगावं तुम्हाला ! अहो खरं बोलून, खरं सांगून, उजळ माथ्यानं राजरोस व्यवहारानं एक तरी लग्न झाल्याचा दाखला आहे का ? तें जाऊं दे,–बरं मग तुमचं ठरलेलं लग्न अजून कां राहिलं आहे ?

**तुराजी** : अहो, मुलखांत कोण हाहाःकार उडाला आहे. अशा वेळीं कुठलं लग्न नि कुठलं कार्य घेऊन बसलांत. लग्न करण्याऐवजीं आहेत त्या बायकापोरांवर तुळशीपत्र ठेवून मायभूमीची चाकरी करण्याचा वखत आला आहे.

**पिराजी** : तुम्हाला आला असेल वखत. आम्ही नाहीं बुवा बायकापोरांवर तुळशी-पत्र ठेवून मायभूमीसाठीं बैरागी व्हायला तयार.

[ लाडोजीसह मोहिते येतात—कलगी जाते.

**तुराजी** : रामराम म्हटलं, साहेब. आपल्यासारख्यांचे पाय आमच्या धन्यांच्या वाड्याला लागल्याबद्दल आनंद झाला आम्हांला.

**लाडोजी :** या जातिवंत इनामदार बच्याचा पायगूणच तसा आहे. या अस्सल इनामदार बच्याचं पाऊल ज्या घरांत घुसेल तिथून कधीं तें बाहेर निघायचंच नाहीं. तुम्ही मला कोण समजतां ? हा इनामदार बच्चा म्हणजे हरळीची मुळी आहे बरं–मुळी.

**बा. मोहिते :** अरे बाळ, थोडी काळवेळ पाहून बोलावं. हें पहा, आतां तूं सासुरवाडीस आला आहेस. तेव्हां तोंड बंद करून थोडं वजनानं वाग.

**पिराजी :** धनीसाहेब, कधींच ठाऊक नसलेली गोष्ट एकदम कशी येईल ? लहान आहेत; शिकतील शहाणपणा हळूहळू.

**लाडोजी :** ए, शाहण्याच्या कांद्या, मला शहाणपण शिकवतोस होय ? घरांतून निघण्यापूर्वी मी तुला काय सांगत होतों कीं, असतील नसतील तेवढे दागदागिने माझ्या अंगावर चढव म्हणून, तेव्हां ऐकलं नाहींस; नि आतां शहाणपण शिकवितोस होय ? त्या सोन्याच्या भारानं या इनामदार बच्याच्या चालण्यांत, बोलण्यांत, हंसण्यांत, दिसण्यांत–सगळ्यांतच वजनदारपणा आला असता.

**पिराजी :** चूक झाली धनीसाहेब. बरं, चलावं म्हटलं आंत. सर्व तयारी आहे.

**लाडोजी :** नाहीं येणार; आतांच बाबांनीं सांगितलं आहे कीं, वजनानं वागावं म्हणून. बादशहापुढं नाकदुराई काढून जसे आम्ही लोटांगण घालीत जातो, तसे या इनामदार बच्यापुढं कोणी लोटांगण घालीत आल्याशिवाय आंत येणार नाहीं. जांवईपणाचा हक्क गाजविण्यासाटीं असा इथं अडून बसल्याशिवाय या इनामदार बच्याचा वजनदारपणा दिसणार तरी कसा ?

**तुराजी :** अहो साहेब, असं काय करतां ? रीतिरिवाजाप्रमाणं आंतील मुख्य दरवाजांत आपली भेट घ्यायला आमचे धनीसाहेब उभे आहेत.

**लाडोजी :** इथपर्यंत यायला त्यांना काय, झालं ? बाबा या इनामदार बच्याचा मान तुम्हांला राखायचा असेल, तर तुम्ही स्वतः आंत जा, आणि त्यांना चांगली समज देऊन इथपर्यंत सामोरी यायला लावा. त्याशिवाय मी इथून हालणार नाहीं.

**बा. मोहिते :** बरं बाबा, घेऊन येतों त्यांना. मग तरी आंत येशील ? पिराजी, चल, आंत जाऊन येऊं. [ जातात. ]

**तुराजी :** अहो साहेब, ते तुमचे वडील ना ? त्यांचा मान तुम्ही राखायचा कां तुमचा मान त्यांनीं राखायचा ?

**लाडोजी** : हें बघ, मानाच्या पानासाठीं बापाला बाप न म्हणण्यांतच जातिवंत इनामदारपणा असतो, लक्षांत ठेव. माझ्यासारखे अस्सल इनामदार बच्चे जहागिरी-साठीं, वतनासाठीं, इतकेंच नव्हे, तर बंदरांतील यःकश्चित करीच्या मानासाठींसुद्धां प्रत्यक्ष भाऊबंदांचे मुडदे पाडायला मागेंपुढें पाहात नाहींत.

**तुराजी** : एकंदरींत आपण मानाच्या पानासाठीं, काका–मामाच्या मानेवर सुरी ठेवायलाहि कचरणार नाहीं म्हणतां ?

**लाडोजी** : मग मी जातिवंत इनामदार बच्चा कसला ? तुला ठाऊक नाहीं ? मागं एकदां वजीरसाहेब आमच्या गांवीं आले होते. त्या वेळीं बाबांच्या पाठीमागून त्यांच्या पायाजवळ कुर्निसात करून, मोटेच्या बैलासारखे मागेंमागें जाण्याचा मान माझा असतां, आमचे काकासाहेब मला मागं करून, आपणच पुढं जात होते. पण तेव्हां काय ? या इनामदार बच्चानं, त्यांचा पाय ओढून त्यांना तोंडघशीं पाडलं, तेव्हां या इनामदार बच्चाचा पराक्रम पाहून सर्वांनीं तोंडांत बोटंच घातलीं !

**तुराजी** : एकूण, त्यांचे पाय ओढून, पाया पडण्याचा मान एकदांचा पटकावला म्हणायचा !

**लाडोजी** : होय. अरे, अशी संधी मिळायला थोर भाग्य लागतं; नाहीं तर तो तुमचा कपाळकरंटा शिवाजी !—

**तुराजी** : काय केलं आमच्या राजांनीं ?

**लाडोजी** : काय सांगावं तुला ? वडिलांच्या पुण्याईनं एकदां विजापूर दरबारांत बादशहाच्या पायावर डोकं ठेवण्याची संधि मिळाली होती. त्या वेळीं, बेट्याच्या डोक्यांत काय घेतलं कुणाला ठाऊक ? त्या मानाला तो अपमान समजला, आणि डोकं फिरल्यासारखं गप्पच बसला.

**तुराजी** : आमच्या राजानं केलं तें बरोबरच केलं, असं नाहीं कां तुम्हाला वाटत ? कारण;

आतां मानपान कसला । देश आपुला तुरुंग झाला ।।
चौ बाजू जखडिला । आतां ।।
धनी असूनी, गुलाम बनला । घरदाराला मुकला ।। १ ।।
परकी सत्ता, घेउनि माथा । दे लत्ता स्वजनाला ।। २ ।।
चोर इथं शिरजोर झाला । शीर नमविता त्याला ।। ३।।

[ दादोजी प्रभू वगैरे मंडळी येऊन लाडोजीस आंत घेऊन जातात.

—स्थळ : दादाजी प्रभूच्या वाड्यांतील देवघर सोपा, रामदासीबुवास देवघरानजीक आसनावर बसविलेलें असतें. नमस्कार वगैरे होऊन दादाजी प्रभू प्रत्येकास बसवितात—

**बा. मोहिते** : दादाजी, इथं पाऊल ठेवल्यापासून पाहतों, एकंदरींत इथला प्रकार कांहीं बरा दिसत नाहीं. प्रत्येक बाबतींत बादशाही हुकूम धाब्यावर बसविण्याचा अगदीं सपाटा चालविला आहे.

**दादाजी** : काय झालं हें थोडं समजलं तर बरं होईल; आणि खरोखर कांहीं चुकत असल्यास सुधारतां येईल. आपल्या बाहेर का आहे ?

**बा. मोहिते** : होय ना ? मग तुमच्या दरवाजावर वाजत असलेला चौघडा अगोदर बंद करा पाहूं. चौघड्याचा मान दरबारांतून मिळाल्याशिवाय तो वाजवितां येणार नाहीं. बंद करायला सांगा पाहूं अगोदर.

**दादाजी** : पूर्वापार चालत आलेल्या वहिवाटीप्रमाणें, हा मंगल प्रसंग म्हणून हें मंगल वाद्य वाजतंय येवढंच.

**बा. मोहिते** : नाहीं. हा मानाचा प्रश्न आहे. चौघडा, नालखी, पालखी, हलगी, दिवटी वगैरे मान पातशाही दरबारांतून मिळावे लागतात. बरं जा, चौघडा बंद करायला सांगून मुलीला घेऊन या पाहूं.

**दादाजी** : काय करायचं, अडला नारायण...[ जातो ]

**लाडोजी** : हगल्ल दिवटी म्हणजे रे काय, पिराजी ?

**पिराजी** : अहो, दिवसा दिवट्या लावून मिळण्याचा तो एक मान आहे.

**लाडोजी** : मग हा मान आमच्यासारख्या इनामदार बच्यांना मिळालाच पाहिजे. आमच्यासारख्या जातिवंत इनामदार बच्यांनीं दिवसा दिवे लावायचे नाहींत तर कुणी लावायचे ?

**तुराजी** : बरोबर आहे. आणि म्हणूनच असलें मान तुमच्या सारख्यासाठींच बादशहानें खास राखून ठेवलेले असतात. मला वाटतं खात्रीनं तो मान आपल्याला मिळेल.

**लाडोजी** : मिळेल म्हणजे मिळणारच.

[ आंतून

मराठा तितुका मिळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥
ये विषीं न करिता तकवा । पूर्वज हंसती ॥ १ ॥

[ वेषधारी शिवाजी प्रवेश करतो.

**लाडोजी** : बाबा ! बाबा !! तो गोसावडा माझ्याकडं डोळे लाल करून रागानं बघतो आहे. त्याला अगोदर बाहेर घालवा पाहूं.

**बा. मोहिते** : काय हो रामदासीबुवा, अगदीं देवघरापर्यंत आसन ठेवलं आहे ? लग्नाच्यां वेळीं पोबारा करणाऱ्या गुरूचे चेले म्हणवितां आणि लग्नकार्याभोंवतीं असे कां घुटमळतां ?

**तुराजी** : ते ताईसाहेबांची भिक्षा घेऊन जाण्यास आले आहेत. भिक्षा घेऊन जातील आपल्या वाटेनं.

**बा. मोहिते** : दीक्षा घेऊन भिक्षा मागणारे हे गोसावडे वरून दिसतात तसे आंतून नसतात. म्हणून म्हणतों–

[ पिराजी मोहित्याच्या कानाशीं गुणगुणतो.

**बा. मोहिते** : तुराजी, थोडासा इकडं ये पाहूं. काय रे, हल्लीं शिवाजी कुठं आहे हें तुला ठाऊक आहे का ?

**तुराजी** : ठाऊक नसायला काय झालं ? ते आमचे राजे कुठं नाहींत असं नाहीं. श्रीकृष्ण देवाप्रमाणं सगळ्या मावळांत भरून उरले आहेत.

**बा. मोहिते** : तें तुझं पुराण नको आहे मला. जें इतकं तुम्ही त्याला देवाप्रमाणं मानतां, तेव्हां त्याच्यांत विशेष असं दिसलं तरी काय ?

**तुराजी** : तसं कांहीं दिसल्याशिवाय का सगळे मावळे त्यांचा शब्द झेलायला तयार झाले आहेत ? अहो, राजगडावर परवा नुकतांच चमत्कार झाला, तेव्हांपासून ते सगळ्यांना देवच वाटूं लागले आहेत.

**बा. मोहिते** : आणि हें चमत्काराचं त्यानं काय गाडबंगाल आरंभलं आहे बुवा ?

**तुराजी** : साहेब, हें गौडबंगाल नाहीं. राजगडाच्या तटाचा पाया खोदीत असतां प्रत्यक्ष अष्टभुजा देवीची मूर्ति तिथं त्यांना मिळाली. उद्यांच त्या मूर्तीची गडावर मोठ्या समारंभानं स्थापना व्हायची आहे. एकजात सगळा मावळा तिथं उद्यां लोटणार आहे.

**बा. मोहिते** : एकंदरींत त्या पोरानं किल्लेकोट बांधून, बादशाहीविरुद्ध कडेकोट तयारी चालू ठेविली आहे म्हणायची ! बरं आहे बचाजी. याचा अगोदर बंदोबस्त केलाच पाहिजे. पिराजी, उद्यां रायगडावर जायची तयारी कर.

[ दादाजी सईस घेऊन येतो.

**पिराजी** : [ मोहित्यांचे आड दडून बसलेल्या लाडोजीरावास ] धनीसाहेब, जरा पुढं जाऊन बसा ना !

**लाडोजी** : अरे, आम्ही तिला पहायला आलों आहों. मी पुढं जाऊन बसेन तर ती मला पाहील ना ?

**दादाजी** : [ सईबाई नमस्कार करून बसल्यावर ] आमची ताई म्हणजे शुद्ध हिरकणी आहे हिरकणी.

**बा. मोहिते** : बरं मुली, तुला कुणाची म्हणतात ? आणि तुझं नांव काय ?

**सईबाई** : जहागीर.

**बा. मोहिते** : काय जहागीर ?

**दादाजी** : तसं नव्हे, जहागिरदाराची मुलगी. सईबाई असं सांगणार होती. थोडी घाबरली आहे, दुसरं काय.

**लाडोजी** : काय, घाबरली ? ये पिराजी, म्हणे घाबरली. दरदर ओढीत नेणाऱ्या खाटकापुढं जशा गाई थरथर कापतात, तसं आमच्यापुढं ही चळचळ कापायला लागली आहे म्हणतात. कापणारच, या इनामदार बच्याचा दराराच तसा आहे !

**दादाजी** : ताई, अशी घाबरतेस काय म्हणून ? घाबरूं नकोस, अग ते काय वाघोबा कां आहेत.

**लाडोजी** : काय, आम्ही वाघोबा नाहीं ? मग काय, हा इनामदार बच्चा बैलोबा आहे असं समजला ? बस्ऽ स्—अशी भलती समजूत करून घ्याल तर आमच्या जातिवंतपणांत कमीपणा येईल. तेव्हां तुमचं तोंड थोडं बंद ठेवा पाहूं—बाबा, जें काय बोलायचं तें तुम्ही बोला. लग्न होईपर्यंत बोलायची फक्त काय ती तुम्हालाच तेवढी परवानगी देतों.

**बा. मोहिते** : मुली, तुझे वडील हल्लीं कोठें आहेत ?

**सईबाई** : बादशहाच्या बंदीखान्यांत आहेत. सध्यां तरी हीच तपश्चर्या त्यांच्या नशिबीं दिसते.



दाजी कोंड०:–हिंदुपद-पातशाही स्थापन करण्यास लायक असेल त्यालाच कौल दे.

[अंक १:५



लाडोजीः—मी पुढं जाऊन बसेन तर ती मला बघेल ना ?　　अंक १ : ३

**बा. मोहिते** : हं ! एकंदरींत, पारतंत्र्याच्या भावनेचे चटके अगदीं आमच्या चुलीपर्यंत जाऊन पोचले आहेत म्हणायचे. बरं, पाहून घेऊं. बरं मुली, तुला लिहितां वाचतां येतं कां ?

**सईबाई** : पोथीपुराण वाचण्याइतकं येतं.

**बा. मोहिते** : आणखी काय काय येतं तुला ?

**सईबाई** : लाठी, बोथाटी, दांडपट्टा, घोड्यावर बसणं वगैरे थोडंथोडं येतं.

**बा. मोहिते** : दादाजी, मी म्हणतों, असल्या शिक्षणाची बायकांना गरज काय ?

**दादाजी** : असल्या धामधुमीच्या काळांत स्वतःचं शील राखण्याला असल्याच शिक्षणाचा उपयोग होतो.

**लाडोजी** : मग आम्ही कशाला आहोंत ? जर का माझ्या बायकोच्या अब्रूवर घाला पडायचा प्रसंग आला तर हा इनामदार बच्चा उगीच बसणारापैकीं नाहीं. जिवाचं रान करून हा एकदम दरबारकडं धूम ठोकील—बादशहाची गांठ घेईल, पाय धरील, आणि बादशहाचे धरून ठेविलेले पाय, दाद मिळेपर्यंत सोडणारच नाहीं. [ सईबाई रागानें जाते ] अरे, आम्ही धूम ठोकून पाय धरण्यापूर्वीच हिनं येथून काढता पाय घेतला कीं !

**बा. मोहिते** : दादाजी, मुलीला थोडं बोलवा बरं; साखरपुडा व्हावयाचा आहे.

**दादाजी** : पण...साखरपुड्याच्या अगोदर साखरपाणी फराळ वगैरे व्हायला पाहिजे. तयारी आहे. तेव्हां म्हटलं उठावं. कधीं नाहीं तें या निमित्तानं का होईना, आपल्यासारख्यांचे पाय घरीं लागले, याबद्दल धन्यता वाटते. तुराजी, चल पुढं. येताहेत म्हणून वर्दी दे पाहूं.

**लाडोजी** : ये पिराजी, असा दगडासारखा का उभा राहिला आहेस ? चल... या लाडोजीरावाचे लग्नांतील लाडवावर हात मारायला लवकर पाय उचल. अरे, आतां कुठं सुरवात आहे.

**तुराजी** : [ रामदासांस ] महाराज, आपण कोरड्या भिक्षेशिवाय कांहीं घेत नसता हें मला माहीत आहे. फार वेळ तिष्ठत ठेवीत नाहीं. आतां भिक्षा येईल हं.

[ वेषधारी रामदासीबुवाशिवाय सर्व जातात सईबाई भिक्षा घेऊन येते. त्याच्या पाठोपाठ लाडोजीराव येतो. ]

**शिवाजी :** स्वार्थासाठीं स्वजना छळिती ।
परक्या पायीं मान तुकविती ॥
जात गोत कांहिं न बघती ।
पहा या जगीं या ॥ १ ॥

**सईबाई :** [प्र.क.] देवधर्म न्यायनीति ।
देशाचें रक्षण करिती ॥
अंति तेच समर्थ होती ।
पहा या जगीं या ॥ २ ॥

**लाडोजी :** लागे पाठी लक्षापाति ।
तुझ्या कां, ही भिक्षा हातीं ॥
असली ही भिकार-रीती ।
कशी नाहीं ठाऊक तुजसी ॥ ३ ॥

**लाडोजी :** हा तुझा भावी पति तुला असं विचारतो कीं, या श्रीमन्त इनामदार बच्चाला पक्वान्नं वाढायचं सोडून, इकडं या भिकारड्याला भिक्षा वाढायला काय म्हणून आलीस ?

**सईबाई :** धर्मरक्षणासाठीं वाहून घेतलेल्या साधुसंतांच्या पोटापाण्याची तजवीज अगोदर करणं, हा आपला धर्म आहे म्हणून.

**लाडोजी :** पण असला धर्म जातीनं करण्यांत, आमच्या खानदानी घराण्याला कमीपणा येतो, याची काय वाट ? असल्या भिकाऱ्यांना गडीमाणसांकडून बाहेरच्या बाहेर मूठभर भिक्षा घालून वाटेस लावायचं असतं. श्रीमंतांनीं असलं काम जातीनं करायचं नसतं, समजलीस ?

**सईबाई :** देवधर्माची असली हेळसांड करणारी श्रीमंती मला नको आहे.

**लाडोजी :** पण मी म्हणतों, बादशाही थाटाच्या सोहाळ्यांत लोळायचं सोडून देवधर्माच्या चाळ्याचे हे भिकार डोहाळे काय म्हणून ?

**सईबाई :** त्या तुमच्या बादशाही सत्तेनें, आम्हांस भिक्षेस लावलं म्हणून.

**लाडोजी :** चूप् ! आमच्या मायबाप खाविंदाबद्दल असं भलतंसलतं बोलूं नकोस. आमच्या श्रीमंतींत बादशाही कृपेनं तुझ्या श्रीमंतीची भर पडत असतां,

असं बोलतेस? तें कांहीं नाहीं,—या श्रीमंत इनामदार बच्चाची तूं बच्चिण,— नव्हे इनामदारीण, जहागिरदारीण होणार आहेस, तेव्हां हे असले भिकार लाड मी चालू देणार नाहीं. चल, फीर मागं पाहूं.

**सईबाई** : जातिवंत मराठ्याच्या लेकी, असल्या दरडावण्याला भीक घालतील असं समजतां होय? चला मुकाट्यानं बाजूला व्हा; माझ्या दानधर्माच्या आड असे याल तर,—

**लाडोजी** : काय करशील?

**सईबाई** : काय करशील? हें पाहिलंत् का? [ खंजीर दाखविते ] आम्ही कुलवान् मराठ्यांच्या लेकी जरी बायका असलों तरी, वाघिणीच्या बच्च्या आहोत.

**लाडोजी** : अरे बापरे! ही गृहलक्ष्मी नसून कडकलक्ष्मी दिसते. बरं जा.—तुला फक्त एक वेळ भिक्षा वाढायची परवानगी देतो. [ सईबाई भिक्षा वाढून नमस्कार करावयाला जाते. इतक्यांत लाडोजीराव येऊन ] हां, खबरदार. मीं तुला फक्त भिक्षा वाढायला परवानगी दिली आहे, नमस्कार करायला नाहीं. आमच्यासारख्या श्रीमंत खानदानी लोकांनीं यांच्या पाया पडायला हा कांहीं बादशहा आहे, का वजीर आहे, का दरबारी हुजऱ्या आहे?

**सईबाई** : हें पहा, असला लोचटपणा बंद करून येथून चालते व्हा कसे अगोदर.

**लाडोजी** : काय! चालता होऊं? आणि तुला घेतल्याशिवाय? शक्य नाहीं. वंशपरंपरेच्या श्रीमंतींत भुरत असलेला हा इनामदार बच्चा असा तसा बाहेर जाणारा नाहीं.

**सईबाई** : असं काय? काय करतां तेंच मला पाहायचंय्. हा पहा मी यांना नमस्कार करतें. [ लाडोजी पुढें होऊन हात धरावयास जातो. ] हां!! खबरदार माझ्या अंगाला हात लावाल तर.

**लाडोजी** : नुसत्या अंगाला हात लावायला इथं आलों नाहीं; तर हात धरायला आलों आहे. इतकेंच नव्हे तर, हा अस्सल इनामदार बच्चा तुझा हात धरून दरदर ओढीत घेऊन जाण्यासाठीं इथं आला आहे. [ सईबाईशीं लगट करायला जातो. वेषधारी रामदासी लाडोजीस खालीं पाडून गुद्दे लगावतो, सईबाई जाते. ] धांवा हो धांवा. हा रामदासी लाडोजीरावाला लाडू चारायला लागला आहे. धांवा कुणी तरी मदतीला. या लौकर. [ येत आहे असें पाहून वेष० रामदासी जातो. पकडा पकडा असें म्हणत त्याचे पाठोपाठ दगडू पळत जातो. ]

[ वेषधारी रामदासाचा पिराजी पाठलाग करतो. बांधून ठेवलेल्या घोड्याजवळ शिवाजी जातो. रामदासी वेष टाकून शिवाजी घोड्यावर स्वार होऊन घोडा फेंकतो. तों प्रकार पाहून दगडोजी परत फिरतो.

**बा. मोहिते** : [ वाड्यांतून लाडोजीराव पळत येतो. पाठोपाठ मोहिते येऊन त्यास अडवितात. ] अरे बाळ, असं एकाएकी कण्हायला काय झालं, आणि इथं आरडाओरड कसली झाली ? अरे ! असा घाबरलास काय म्हणून; काय झालं तें सांगशील कीं नाहीं ?

**लाडोजी** : काय सांगू तुम्हाला, वंशपरंपरेनं इनामदारी भोगणारे तुम्ही, पण तुमचाच निर्वंश होण्याची पाळी आली होती. दैवानं खैर केली म्हणूनच हा इनामदार बच्चा बचावला.

**बा. मोहिते** : अरे शुभकार्याचे वेळीं असं अशुभ काय बोलतोस ?

**लाडोजी** : शुभ प्रसंगाच्या निमित्तानं या इनामदार बचाची झाली येवढी शोभा पुरे झाली.

**बा. मोहिते** : बाळ, असं काय करतोस ? ज्यासाठीं आम्ही इथं आलों तें कार्य पार पडायला नको का ? हें बघ, अगोदर आपलं कार्य साधून घेऊं नि मगं कुणी तुझा अपमान केला असल्यास त्याचा चांगलाच सूड घेऊं. चल पाहूं अंत.

**लाडोजी** : नको, पुरे झाली तुमची ती मेजवानी, चांगले सडकून पोटभर–नव्हे पाठभर या लाडोजीरावाला लाडू मिळाले. तुम्ही म्हणत होता तेंच खरं झालं. तो तिथं बसलेला खरा रामदासी नसून, बाबा, तो बोकेसंन्याशी होता.

**बा. मोहिते** : असं काय ! तरी मला शंका आलीच होती. बरं, काय केलं त्यानं ?

**लाडोजी** : काय केलं आहे ? आणाखिन् काय करायचं ठेवलं आहे ? आपल्या पायांनीं चालत आलेल्या या इनामदार बचाला साखरपुड्याच्या समारंभाऐवजीं फाल्गून मासांतील समारंभ साजरा करायला लावला.

**बा. मोहिते** : कुठं आहे तो हरामखोर रामदासी. लक्षांत ठेव म्हणावं, गांठ आहे माझ्याशीं. नजरेस पडूं दे,–होता का नव्हता असा करून टाकतो.

**लाडोजी** : अहो काम झाल्यावर इथं राहतोय कशाला ? जेव्हां या इनामदार बचानं पांचजन्य सुरू केला त्याबरोबर बेट्यानं पोबारा केला. पाठोपाठ पिराजी गेला आहे त्याला पकडायला.

**बा. मोहिते :** होय काय; मग येऊ दे त्याला. या कारस्थानाचा शेवट लावल्याशिवाय जायचं नाहीं.

**लाडोजी :** बाबा, या दादाजीस सामील करून येऊन त्या शिवाजीनं तर हें कपट कारस्थान रचलं नसेल ?

**बा. मोहिते :** रचूं दे, वाटेल तितकीं कारस्थानं रचूं दे. हा मोहिते सर्वांना पुरा पडून उरण्याइतका आहे म्हणावं.

**लाडोजी :** बाबा, काय सांगूं तुम्हांला ! त्या बगळेबुवाचं सगळं लक्ष माझ्या बायकोकडं होतं बघा. मला वाटलं तिला पळवून नेण्याच्या विचारांत होता तो. खरंच बाबा, या इनामदार बच्चाच्या हातून पांचजन्य ठोकण्यांत जर का थोडी कसूर झाली असती, तर त्वंपुरा वाजवीतच आम्हाला परत जावं लागलं असतं.

**बा. मोहिते :** मला वाटतं त्या शिवाजीनंच आमच्या विरुद्ध ही भुतावळ उठविली असली पाहिजे. पण असल्या बुजगावणीला भिऊन आम्ही हात हालवीत परत जाऊं अशी जर त्याची समजूत झाली असेल तर ती तावडतोब दूर केली पाहिजे. बाळ चल, आतां आपला मोर्चा या राजगडाकडं वळवूं. चल कसा.

## [ ४ ]

— **स्थळ :** दादाजी प्रभूच्या वाड्याची देवडी —

**पिराजी :** [ प्र. क. ] धनी, अहो धनी, कोण आहे वाड्यांत ?

**कलगी :** [ प्र. क. ] कोण पाहिजे तुम्हांला ? आणि आंत येऊन विचारायचं सोडून, भिकाऱ्यासारखं असं दारांत कां ओरडत उभे आहांत ?

**पिराजी :** घरांतल्या माणसाची बाहेर भेट घ्यावी म्हणून, समजलात ?

**कलगी :** मग झाली ना भेट, आतां जाऊं घरांत परत ?

**पिराजी :** घराबाहेर काढायला आलेला दारांत उभा असता, त्याला टाकून पुन्हां परत घरांत जाणार म्हणतां ? मर्जी !

**कलगी :** हें पहा, मला असलं अढीतेढीचं बोलणं समजत नाहीं. तुम्हाला काय पाहिजे तें सांगा पाहूं ?

**पिराजी :** मला काय पाहिजे तें मींच सांगावं म्हणतां ? माझं तूर्त बाजूला राहूं दे. पण आमचे धनीसाहेब कुठं आहेत, तें अगोदर सांगा पाहूं. मला समजलेली महत्त्वाची बातमी त्यांना केव्हां सांगेन असं झालं आहे.

**कलगी** : काय ? महत्वाची बातमी आहे ! आणि कुणाला न सांगण्याइतकी तीं महत्त्वाची आहे ?

**पिराजी** : होय, आणि ती सांगितल्यावर त्याचं महत्त्व तें काय राहिलं–हें पहा, आतां त्यासंबंधानं येवढंच सांगावसं वाटतं कीं, तुम्ही म्हटल्याप्रमाणं दिसतं तसं नसतं, हेंच खरं होतं, पण तें सांगणाऱ्याला कळलं असं मला कुठं पटतं.

**कलगी** : आणि तें पटवायलाच आला वाटतं. एकंदरींत तुम्ही वर दिसतां तसें आंत नाहीं म्हणतां, लौकर कळलं, ठीक झालं.

**पिराजी** : छे ! छे !! भलतंच, आंत एक आणि वर एक, आणि तुमच्या जवळ ! शक्य नाहीं.

**कलगी** : हातच्या कांकणाला आरसा कशाला ? समजलेली बातमी प्रत्यक्ष चोरून ठेवतां आणि वर आपण त्या गांवचेच नाहीं असं दाखविता ! धडधडीत किती किती खोटं बोलतां ?

**पिराजी** : काय ? शिवाजीबद्दल मला समजलेली बातमी, तुझ्याजवळ चोरून ठेवीन असं का तुला वाटतं ? हें बघ, आतां तूं आणि मी दोन नाहीं; तेव्हां तुला सावध करण्यासाठीं एक गोष्ट सांगतो, लक्षांत ठेव. त्या शिवाजीच्या कारवाया-पासून दूर रहात जा. नाहीं तर त्याच्या कारस्थानांत सांपडशील आणि पश्चात्तापांत पडशील.

**कलगी** : होय का ! मग मला सावध राहिलंच पाहिजे.

**पिराजी** : होय, त्याच्या वाऱ्याला सुद्धां राहूं नकोस–तुमचा त्या शिवाजीवर केवढा तरी विश्वास. पण त्याचा कुठं तुमच्यावर विश्वास आहे. बघ, तुम्ही काय करतां, कोठें जाता यावर त्याची गुप्त पाळत आहे.

**कलगी** : छे, आम्हाला नाहीं खरं वाटत ! पण हें कशावरून तुम्ही म्हणता ?

**पिराजी** : कशावरून, आतां तुह्माला काय सांगावं. नुकताच वाड्यात जो राम-दासी आला होता तो खरा रामदासी नसून प्रत्यक्ष शिवाजी होता. मी त्यांना पकडणार इतक्यांत स्वारी घोड्यावरून पसार झाली.

**कलगी** : खरं कीं काय ? पण राजांना असं येण्याचं कारण काय ?

**पिराजी** : आणि कसलं कारण ? तुमच्यावर पाळत ठेवण्यासाठीं, समजलं. बरं तें राहूं दे. ही बातमी धनीसाहेबांना केव्हां सांगेन असं झालं आहे. चल, आमचे धनीसाहेब कुठं बसलेत तें दाखव बरं.

**कलगी** : अहो, तुमचे धनीसाहेब येथे असतील तर आम्ही दाखविणार. ते तर केव्हांच परत गेले. जाते वेळीं दादासाहेबांना सांगूनसुद्धां गेले नाहींत.

**पिराजी** : होय का ? तर मग त्या रामदासानं आमच्या छोट्या धन्याला लाडू चारलेली बातमी समजली वाटतं.

**कलगी** : काय !—त्या रामदासानं लाडोजीरावाला लाडू चारले ?

**पिराजी** : अग, असे तसे लाडू चारले नाहींत तर चांगले धम्मक लाडू चारले. आणि लाडू चारणारा रामदासी नसून, प्रत्यक्ष शिवाजी होता. ही बातमी आमच्या धनीसाहेबांना समजली तर आकाश–पाताळ एक करून त्या शिवाजीचा सूड घेतल्याशिवाय रहाणार नाहींत, हें तूं पक्कें समज. चला, आधींच पेटलेल्या धनीसाहेबांच्या क्रोधाग्नीला आमच्या बातमीची फुंकर मारावी आणि राजगडावर जाऊन देवीच्या मंडपांत गोंधळ उडवून द्यावा. हें पहा, आतां मी जातों. राजगडावरील गुप्त मोहिमेची कामगिरी अगोदर पार पाडतों, नंतर तुझ्या भेटीस येतों.

[ जातो. तुराजी येतो—

**कलगी** : [ घाईनें जाणाऱ्या तुराजीस ] का—माझ्याकडं ढुंकूनही न पहातां बाहेर जाण्याची येवढी घाई कसली ?

**तुराजी** : हें बघ, इथं हा घडलेला प्रकार शिवाजीराजांस कळविण्यासाठीं दादासाहेबांचं पत्र घेऊन राजगडावर निघालों आहे.

**कलगी** : शिवाजीराजाला इथला प्रकार माहीत नाहीं म्हणून सांगायला जाणार असाल तर जाण्याचें कारण नाहीं. त्यांना सर्व कांहीं माहीत आहे. ज्यासाठीं आमाच्या राजानं अवतार घेतला आहे, त्याच्या करणीचा थांग कुणाला लागणार आहे का ? चोरून कशाला ठेवूं ? नुकतेच वाड्यांत येऊन गेले ते खरे रामदासी नव्हते—प्रत्यक्ष आमचे शिवाजीराजे होते. आतां तरी समजलं.

**तुराजी** : खरं म्हणतेस कीं काय ?

**कलगी** : होय, अगदीं खरं. धन्यास हुडकीत आलेल्या पिराजीकडून ही बातमी मीं काढून घेतली. आतां तीं पिसाळलेलीं कुत्रीं राजगडावर जाऊन तेथल्या समारंभांत रात्रभर गोंधळ उडवून सूड घेणार आहेत म्हणे.

**तुराजी** : बरी वेळेवर बातमी सांगितलीस. आतां ही बातमी राजाच्या कानावर घालण्यासाठीं असाच अगोदर राजगडावर जातों, दादासाहेबांच्या पत्राची पुरी कामगिरी करतों.

**कलगी :** अहो, पण येवढ्या मोठ्या समारंभांत, राजाजवळ तुम्हाला कसं जातां येईल ?

**तुराजी :** शिवाजीराजाच्या तालमींतला, हा नेकजात मराठा असल्या कामगिऱ्या म्हणजे हातचा मळ समजतो. हें बघ, आतां मोहिते मंडळी राजगडावर जाऊन गोंधळ उडविण्याच्या अगोदर–मी स्वतः गोंधळी होऊन तिथं जातों–नारळांत पत्र घालून–तोच नारळ प्रसाद म्हणून त्यांचे हातीं देतों. आणि मग त्या हरामखोरांचा कसा गोंधळ उडवतो पहा तर खरा. [ जातात.

## [ ५ ]

**— स्थळः—**राजगडावरील देवीचा सभामंडप —

[ मंगलवाद्यें वाजतात. देवीच्या गाभाऱ्यास पडदा लावून आंत जिजाई पूजा करीत आहेत. दादाजी कोंडदेव येणाऱ्या मोहिते मंडळीस नमस्कार वगैरे करून बसवितात.

**बा. मोहिते :** दादाजी, कसला गोंधळ चालविला आहे इथं तुम्ही ?

**दादा० कोंडदेव :** मायभूच्या रूपानं भूगर्भांतून प्रगट झालेल्या स्वातंत्र्यदेवीची इथं आज प्राणप्रतिष्ठा आहे, ठाऊक नाहीं का आपल्याला ?

**बा. मोहिते :** ठाऊक नसायला काय झालं ? स्वातंत्र्याच्या नांवाखालीं पोराबाळांचे प्राण धोक्यांत घालून आपली प्रतिष्ठा वाढवून घेणाऱ्या गुरूची कारवाई केव्हांच समजली आहे.

**लाडोजी :** काय हो स्वातंत्र्यभक्त, मी–म्हणजे हा इनामदारांचा बच्चा असें तुम्हाला विचारतों कीं, इतके दिवस जमिनींत दडून बसल्या वेळीं त्या तुमच्या स्वातंत्र्यदेवीचं देवपण कुठं गेलं होतं ?

**शिवाजी :** देवाचं देवपण कुठं गेलं नसून, तें पहाणाऱ्यांच्या डोळयांवर गुलामगिरीचं किटण चढलं आहे. तें किटण, ती झांपड थोडी झाडून पहा; म्हणजे सर्व कांहीं दिसेल.

**बा. मोहिते :** मग आतां आपण काय करायचं ठरविलं आहे ?

**शिवाजी :** आमची स्वातंत्र्यदेवी सांगेल त्या मार्गानं जाण्याचं.

**लाडोजी** : ये पिराजी, भटाब्राह्मणांच्या मंत्रानं भारलेली ही दगडाची मूर्ति म्हणे यांना मार्ग दाखविणार ?

**दादाजी कोंड०** : होय. दगडासारख्या हृदयालाहि पाझर फोडून राष्ट्राच्या भावना जागृत करणारी ही मूर्तीच आम्हांला मार्ग दाखविणार.

**बा. मोहिते** : अहो गुरु, पुरें करा हें तुमचं पुराण ! पोथ्या–पुराणाच्या बासनांतील तीं तुमचीं जुनींपुराणीं मतं आमच्यापुढं नाहीं चालायचीं. असल्या जाळ्यांत यांच्याप्रमाणं आम्ही मात्र सांपडणारे नव्हेत, हें पक्के लक्षांत असूं द्या.

**दादाजी कोंड०** : साहेब, आपल्याला हात जोडून सांगणं आहे कीं, आपण अशी भलतीच समजूत करून घेऊं नका. आम्ही जाळ्यांत पकडणारे नसून आमच्या धर्मावर, देशावर घाला घालून लूटमार करण्यासाठीं टाकलेल्या मोहजालांतून बाहेर काढणारे आहोंत.

**शिवाजी** : गुरुदेव, अनाठायीं उपदेश करण्याचें कशाला श्रम घेतां ? अक्रूरजीच्या उपदेशानं कंसमामा वळता तर श्रीकृष्णाला आपल्या मामाच्या विरुद्ध हातीं शस्त्र घेण्याचं कारणच पडलं नसतं !

**बा. मोहिते** : म्हणजे तुमच्या म्हणण्याप्रमाणें जर आम्ही वागलों नाहीं तर आमचे विरुद्ध तुम्ही हातीं शस्त्र घेणार म्हणायचे ! गुरु, चांगलंच शिक्षण सुरू आहे !

**लाडोजी** : अरे, भटुरग्यांनो ! तुमचीं पोथ्यापुराणं जाळून भस्म करण्याचा एवढा सपाटा चालू आहे तरी भस्माचा पट्टा ओढलेलीं डोकीं पुन्हां वर काढतांच का ? थांबा, बादशहाकडून तुमच्या जातीचाच नायनाट करायला लावतों. त्याशिवाय तुम्ही आम्हांला सुखानं राहूं देणार नाहीं.

**दादाजी कोंड०** : बाळ, आमचा नायनाट करून तुम्हाला–आमच्या धर्मबांधवांना खरोखर सुख मिळणार असेल तर, आमच्या जिण्यावर पाणी सोडायला आम्ही एका पायावर तयार आहोंत.

**बा. मोहिते** : अहो गुरु, पाय धुऊन साखळ्या काढून घेण्याची कारवाई पुरे करा. पण मी तुम्हाला असं विचारतों कीं, इतके दिवस पारतंत्र्याच्या गर्तेंत खितपत पडलेल्या त्या तुमच्या स्वातंत्र्यदेवीला, पुन्हां अशी कां सात पडद्यांत कोंडून ठेविली आहे ? दाखवा ना तिचा काय प्रभाव आहे तो एकदां !

**दादाजी कोंड०** : दर्शनाचा प्रभाव अनुभवाशिवाय समजणार कसा ?

[ शिंगाच्या वगैरे वाद्यघोषांत जिजाबाई बाहेर येते.

**लाडोजी** : ये पिराजी, इकडं पाहिलंस का? त्या दगडाच्या देवींत भटाच्या मंत्रानं जीव भरून, चालती–बोलती होऊन इकडं येत आहे. [शिवाजीस] कायहो स्वातंत्र्यभगत, हीच का तुमची स्वातंत्र्यदेवी?

**शिवाजी** : होय. पारतंत्र्याच्या गर्तेतून बाहेर काढून, स्वातंत्र्यस्फूर्ति देणारी, हीच माझी व माझ्या आवडत्या महाराष्ट्राची स्वातंत्र्यदेवी.

[ जिजाई येते. सर्व उठून रामराम वगैरे करतात.

**जिजाई** : दाजी, केव्हां आलात? या बसा. या समारंभाच्या वेळीं आपण होऊन येऊन आपलेपणा दाखविल्याबद्दल मला किती आनंद झाला म्हणून सांगूं?

**बा. मोहिते** : मासाहेब, काय चालवलं आहे हें तुम्हीं! बादशहास अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी जाणून बुजून काय म्हणून करीत आहांत

**जिजाई** : काय ? आमच्या घरीं करीत असलेले देवदेवतांचे उत्सवहि बादशहाला अप्रिय वाटूं लागले? धर्मप्रमाणं वागण्याचं आमच्या घरांतसुद्धां आम्हांला स्वातंत्र्य नाहीं?

**बा. मोहिते** : मी म्हणतों, असल्या स्वातंत्र्याच्या भलत्या कल्पना उराशीं बाळगून, कारण नसता सुखाचा जीव धोक्यांत काय म्हणून घालतां ?

**जिजाई** : म्हणजे–आम्हीं सुखांत आहोंत अशी का कल्पना आहे आपली ? पण, राहूं दे. असल्या गोष्टी बोलण्याचं हें स्थळहि नाहीं व ही वेळहि नाहीं. आपल्याला या बाबतींत जें काय बोलायचें तें घरीं बोलूं. दिवाणजी, आतां काय व्हावयाचं राहिलं आहे ?

**दादाजी कोंड०** : मासाहेब, बहुतेक सर्व झालंच आहे. आतां फक्त देवीपुढं गोंधळ व्हायचा राहिला आहे.

**तुराजी** : [ वेषधारी तुराजी प्र. क. ] राजे, या खोऱ्यांतील सगळ्या वतनदार गोंधळ्यांतर्फे आणलेल्या या प्रसादाचा स्वीकार व्हावा. [ नारळांत पत्र असल्याचें खुणावतो ] उदो ! उदो !! आई जगदंबे भक्ताचा संभाळ करग. आई–उदो ! उदो !!

**दादाजी कोंड०** : हं ! गोंधळीबुवा, करा सुरवात.

[ गोंधळी काकडे पेटवून गोंधळ घालण्यास सुरवात करतो.

**लाडोजी** : अरे बापरे ! या देवीचे हे भुते आतां चोहोंकडे आग लावून राखरांगोळी करीत सुटणार कीं काय ?

**शिवाजी :** होय. अन्तःकरणांत पेटलेल्या या स्वातंत्र्यज्योती बादशाही सत्ता जाळून भस्म केल्याशिवाय केव्हांहि शांत होणार नाहींत.

उदो, उदो, जगदंब माउलि उदो ॥
हा भुत्या तुझ्यापायीं ॥ नाचवी पोते आई ॥ ध्रु० ॥
आप्त गोतगण हटकुनी सगळे ॥
काळ रात, दूर जात, सादवीत, उधळी ॥ उदो उदो ॥ १ ॥

[ काकडे पेटवून गोंधळ चालू असतो. गोंधळ्याच्या अंगांत देवी संचारते. गोंधळ बंद होऊन लोक त्याच्या भोंवती जमतात.

**दादाजी कोंड० :** देवीची काय इच्छा आहे ? काय पाहिजे देवीला ?

**बा. मोहिते :** अहो, ती दुसरं काय मागणार ? आपल्या भगतगणांची खळगी भरण्यासाठीं, चारदोन बकरीं, नाहीं तर दहावीस कोंबडीं मागणार—दुसरें काय ?

**वे. तुराजी :** मला दुधाची तहान लागली आहे.

**जिजाई :** काय, देवीला दूध पाहिजे आहे ? जा बाळ, तूं स्वतः जाऊन दूध आणून देवीला नैवेद्य दाखव पाहूं !

**वे. तुराजी :** नको, नको ! हें असलं दूध मला नको आहे. मला वाघिणीचं दूध पाहिजे !

**बा. मोहिते :** काय वाघिणीचं दूध मागते ?

**दादाजी कोंड० :** मग यांत नवल काय ? शेळपट झालेल्या महाराष्ट्राची आदिमाता अशा वेळीं दुसरं काय मागणार ?

**जिजाई :** दिवाणजी, या आदिमातेची इच्छा या वेळीं कोण बरं पुरवील ?

**शिवाजी :** मासाहेब, अशी काळजी करण्याचं काय कारण ? मला आज्ञा द्या, आदिमातेला लागलेली तहान भागविण्यास हा शिवाजी एका पायावर तयार आहे.

**वे. तुराजी :** या वेळीं जो सुपुत्र माझी इच्छा तृप्त करील तोच हिंदवी स्वराज्याचा, गोब्राह्मण प्रतिपालक छत्रपति होईल.

**जिजाई :** [ पुढं पुढं सरसावत असलेल्या शिवाजीस ] बाळ, थोडं थांब पाहूं. [ मोहित्यांस ] ऐकला का देवीचा कौल. देवीची ही इच्छा पुरवून आपले चिरंजीव जरी छत्रपति झाले तरी मला आनंदच आहे.

**शिवाजी** : त्याच छत्राखालीं हिंदवी स्वराज्याची सेवा करायला हा शिवाजीसुद्धां तयार आहे.

**बा. मोहिते** : हिकमत पण हिकमत! वाघिणीच्या दुधाच्या निमित्तानं काळाच्या जबड्यांत लोटण्याची आणि विषाची परीक्षा आपण न पाहतां पाहुण्याकडून साप मारविण्याची, चांगली आहे ही तुमची मसलत! हें पहा, आतां तुम्ही जा म्हटलं तरी आम्ही जाणार नाहीं. देवाधर्माच्या नांवाखालीं बादशाही सत्तेविरुद्ध चालविलेला पुंडावा मोडल्याशिवाय आम्ही येथून हालणार नाहीं.

**जिजाबाई** : असा भलताच अर्थ घेऊं नका आपण,—आपली इच्छा नसल्यास राहूं दे. बाळ, तूं जा, देवीची इच्छा तृप्त करून, हिंदवी स्वराज्य स्थापन करण्याची लायकी सिद्ध कर पाहूं!

**शिवाजी** : मासाहेब, तुमचा कार्यतत्पर आशिर्वाद माझ्या पाठीशीं असल्यावर हा शिवाजी काळाच्या जबड्यांतहि उडी घ्यायला कचरणार नाहीं. येतों.

**दादाजी कोंड०** : धन्य धन्य मासाहेब!! स्वराज्यासाठीं पोटच्या गोळ्याची आहुति देण्यास तयार होणाऱ्या तुमच्यासारख्या माता, आणि हातांत शिरकमल घेऊन उडी घेणारे सुपुत्र ज्या ठिकाणीं उदय पावतात त्या देशाची पारतंत्र्याची रात्र संपलीच म्हणून समजावें.

[ सर्वांचा निरोप घेऊन शिवाजी जातो.

**जिजाई** : दिवाणजी, बाळाला यश मिळण्यासाठीं देवीच्या मानसपूजेंत मन गुंतविते. सुयश घेऊन येणाऱ्या बाळाशिवाय माझ्या मानसपूजेचा भंग न होण्याची खबरदारी घ्या.

**दादाजी कोंड०** : मासाहेब, मनोभावानं आरंभलेल्या तपश्चर्येचं फळ मिळाल्या-शिवाय राहणार नाहीं, याची खात्री ठेवा. [ जिजाई देवीपुढें ध्यानस्थ बसते.

**लाडोजी** : कसलं आणतो आहे वाघिणीचं दूध! मला वाटतं लोकांवर छाप ठेवण्यासाठीं, वाघिणीचं दूध म्हणून बेटा शेळीचंच् दूध घेऊन यायचा. ये पिराजी, चल कसा; आपण त्याच्या पाठोपाठ पाळतीवर राहून, त्याचं बिंग बाहेर फोडूं. त्याशिवाय इथल्या लोकांचे डोळे उघडायचे नाहींत! बाबा, माझ्या कार्यांत यश यावं म्हणून तपश्चर्येसाठीं एकदां कां तुम्ही डोळे मिटले, कीं हा इनामदार बच्चा आपला पराक्रम दाखवायला पुढं सरसावलाच म्हणून समजा. पिराजी, चल लौकर, त्याची पाठ सोडतां कामा नये.

[ पिराजी व लाडोजी जातात.

[ शिवाजी घोड्यावर स्वार होऊन दऱ्याखोरीं धुंडाळतो. त्याच्या पाळतीवर पिराजी व लाडोजी स्वार होऊन जातात. पाठलाग चालू असतांना शिवाजी एका झाडाला घोडा बांधून वाघाच्या जाळीचा शोध करतो व आंत शिरत असतां वाघीण डुरकाळी फोडते. ती ऐकून पाठलाग करीत असलेले लाडोजी व पिराजी झाडास बांधलेल्या घोड्यास सोडून देतात व जवळ असलेल्या शेतकऱ्याच्या झोंपडींत शिरतात. तिथं एक शेळी दिसते. तिचें दूध काढतात. शिवाजी वाघिणीचें दूध काढतो व बाहेर येऊन पाहतो तों घोडा नाहीं. तसाच पायीं जाण्यास निघतो. इकडे शेळीचें दूध घेऊन राजगडाकडे लाडोजी व पिराजी शिवाजीचे अगोदर पोहोंचण्यासाठीं दौड मारतात.

**लाडोजी** : [ प्र. क. ] काय बाबा ? अजून डोळे मिटले नाहींत ! एकंदरींत या इनामदार बच्चाचा राज्याभिषेक त्या डोळ्यांनीं पाहणार म्हणायचे. पहा, या—या जातिवंत इनामदार बच्चाचा राज्याभिषेक त्या उघड्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहा; आणि स्वर्गातील पितरांना स्वतः जाऊन सांगा कीं, तुम्हाला पाणी पाजणारा, वंशवृद्धि करणारा तुमचा वंशज मोठी कार्यसिद्धी करून आला आहे म्हणून—

**बा. मोहिते** : अरे बाळ, काय केलंस तें तरी सांगशील कीं नाहीं !

**लाडोजी** : काय केलं ? पहा, मीं काय केलं हें प्रत्यक्ष पहा. [ दुधाचा पेला दाखवून ] सात पिढींत कोणी पराक्रम गाजविला नसेल असा पराक्रम करून, राजा होऊं घातलेला हा इनामदार बच्चा वाघिणीचं दूध घेऊन आला आहे. [ दादाजीस ] कां हो, गुरु ! तुम्ही कां अशी खालीं मान घातली आहे ?—हें दूध वाघाचं नसून शेळीचं वाटतं कीं काय ? मला तुम्ही अगदीं बोळ्यानं दूध पिणारा समजलां होतां, नाहीं का ? पण खूप समजून रहा कीं, तुमच्या कारस्थानावर या इनामदार बच्चानं चांगला बोळा फिरविला आहे.

**दादाजी कोंड०** : आपण ज्याला कारस्थान समजतां, तें हिंदवी स्वराज्यस्थापनेसाठींच ना ? आमच्या बालराजाऐवजीं आपण छत्रपति झालां तरी आम्हाला आनंदच वाटणार आहे.

**बा. मोहिते** : मग दाखवा ना तुमच्या त्या देवीला हा नैवेद्य, पाहूं तर खरं कसलं राज्य देते ती.

**लाडोजी** : बाबा, या दगडाच्या देवीचं राज्य म्हणजे दगडमातीचं आणि भिकारड्या लंगोट्यांचं असायचं ! आपल्याला नको बुवा असलं भिकारडं राज्य; आपल्याला राज्य पाहिजे—पण तें बादशहानीं दिलेलं, बादशाही थाटाचं राज्य पाहिजे.

**बा. मोहिते** : अरे बाळ, थोडं थांब; पाहूं तर खरं, यांची ही दगडाची देवी काय करते ती. [ दादाजीस ] अहो गुरु, मग–दाखवा ना तुमच्या त्या देवीला हा नैवेद्य.

**दादाजी कोंड०** : बाळराजे आल्याशिवाय मानसपूजेचा भंग करूं नये अशी मासाहेबांची आज्ञा आहे, तेव्हां—

**लाडोजी** : अहो आतां कसला येतो आहे तो. त्याच्या पाठोपाठ पाळतीवरच आम्ही होतों. काय सांगावं तुम्हांला; तो तुमचा शिवाजी वाघाच्या जाळींत जो शिरला तो पुन्हां बाहेर आलाच नाहीं.

**दादाजी कोंड०** : काय म्हणतां !

**पिराजी** : होय. आणि त्यांचा मोकळा घोडा सैरावैरा पळत असलेला आम्हीं प्रत्यक्ष पाहिला. काय झालं असेल तें परमेश्वर जाणें.

**दादाजी कोंड०** : काय ? बाळराजांचा घोडा मोकळा पाहिला ! परमेश्वरा, कोणत्या संकटांत ढकलणार आहेस आम्हाला !! तुम्ही सांगता ही हकीकत खरी आहे काय ?

**लाडोजी** : होय–होय, खरी आहे. खोटं बोलणं इनामदार बच्चाच्या पांचवीला पूजलं आहे असं तुम्हीसुद्धां समजता कीं काय ?

**दादाजी कोंड०** : बाळ, तसं नव्हे. पण,—आमचे बालराजे कोणत्या दरींत गेले ती जागा मला दाखवाल का ? त्यांना पाहण्यास माझं मन कसं अधीर झालं आहे !

**लाडोजी** : नाहीं बुवा, आपल्याच्यानं आतां पाऊलसुद्धां उचलवणार नाहीं.

**दादाजी कोंड०** : बरं, पण ती दरी कोणत्या बाजूला आहे ? कोणत्या मार्गानं तुम्ही गेला होतां, तें तरी कृपा करून सांगाल का ?

**लाडोजी** : अहो गुरु, सरळ मार्गानं कां असलीं कामं होत असतात ? आडमार्गानं जाण्यास सरावलेला हा इनामदार बच्चा, सांगेल तसं गेला कीं त्या काळदरींत पोहोंचलाच म्हणून समजा. हें पहा, असे आतां नाकासमोर सरळ चला, मग थोडं डावीकडं वळून उजवीकडं फिरा, आणि मग थोडं पुढं जाऊन, आडरानांत शिरा—

**दादाजी कोंड०** : छे ! यांच्याकडून सरळ उत्तराची अपेक्षा करून वेळ दवडण्यांत अर्थ नाहीं. साहेब, थोडे बसा हं, हा मी आलोंच. [ जातो

**लाडोजी** : कां, बाबासाहेब, कशी शक्कल काढून एकेकांना वाटेला लावलं! मला अगदीं अक्कल नाहीं असं समजत होता, नाहीं का ? बऱ्यावाईट प्रकारानं वाटेल त्याची वाट लावणाऱ्या या इनामदार बच्चाचा जातिवंत गुण वेळेशिवाय कसा दिसेल !

**बा. मोहिते** : तें काय विचारावं ! आहेसच तसा तूं बहुगुणी. पण थोडं थांबा. बराच वेळ मासाहेब डोळे मिटून बसल्या आहेत. त्यांचे तेवढे डोळे उघडायची कामगिरी झाली, कीं जायला हरकत नाहीं. [ जिजाईस ] मासाहेब, आतां तरी डोळे उघडणार कीं नाहीं ? राज्य देणाऱ्या देवीसाठीं आणलेलं, वाघिणीचं दूध पहायला तरी डोळे उघडाल कीं नाहीं ? पाहूं तर खरं, नैवेद्य दाखवून माझ्या राज्याभिषेकाच्या तयारीला लागतां, कां आपल्या मुलासाठीं नेत्राभिषेकाला सुरवात करतां,–परीक्षेचीच वेळ आहे.

**जिजाई** : [ बाहेर येऊन ] परीक्षा ? कसली परीक्षा ? आणि कुणाची परीक्षा !

**बा. मोहिते** : नाहीं म्हटलं आतां आपल्याच परीक्षेची वेळ आहे. या माझ्या चिरंजिवानीं तुमच्या त्या राज्य देणाऱ्या देवीसाठीं वाघिणीचं दूध आणलं आहे. आणि आपले चिरंजीव—छे ! आतां ते चिरंजीव तरी कसले,—

**जिजाई** : काय, माझा बाळ चिरंजीव नाहीं असं समजतां ? कुणी कांहीं जरी सांगितलं, कुणी कांहीं जरी अभद्र बोललं, तरी त्यावर माझा विश्वास बसणार नाहीं. माझं मन मला खात्रीनं ग्वाही देत आहे कीं, आमच्या महाराष्ट्रांत कीर्तिरूपानं माझ्या बाळाचं नांव चिरंजीवच राहील. दिवाणजी, दिवाणजी, दिवाणजी–कुठं गेले हे ?

**बा. मोहिते** : दुसरीकडं कुठं जाणार ? तुमचं बाळ ज्या दरींत गडप झालं त्यांतच गडप व्हायला गेले आहेत ते. भलत्याच भ्रमानं आपल्या मुलास छत्रपति करण्याची हांव धरून, मासाहेब, काय केलंत हें ?

**जिजाई** : क्षत्रिय धर्मास उचित तेंच केलं, आणि त्या धर्मासाठीं मायेला आवर घालण्याचा धर्म, ही जिजा केव्हांहि विसरणार नाहीं.

**बा. मोहिते** : एकंदरींत, मातृधर्मापेक्षां राष्ट्रधर्म तुम्हांला श्रेष्ठ वाटतो म्हणायचा.

**जिजाई** : होय, आणि त्या धर्माला जागूनच, माझ्या थोरल्या मुलाची, माझ्या पोटच्या गोळ्याची कनकगिरीच्या रणयज्ञांत आहुति दिली.

**बा. मोहिते :** आणि म्हणूनच राहिलेल्या आपल्या धाकट्या मुलाला कालमुखांत लोटण्याचं, त्याच धर्माच्या नादानं दिव्य केलंत वाटतं.

**जिजाई :** होय. असलं दिव्य पार पाडणारे सुपुत्रच, आपल्या मायभूमीचं रक्षण करायला आणि मानानं जगायला लायक असतात.

**लाडोजी :** मग या इनामदार बच्चानं शेळीचं–नव्हे वाघिणीचं दूध आणून लायकी सिद्ध केली कीं नाहीं ? तुमच्या शिवाजीप्रमाणं नालायक तरी ठरलों नाहीं ना ?

**जिजाई :** कोण नालायक; माझा बाळ नालायक ?

**बा. मोहिते :** मग शंका आहे कीं काय ? राजश्री करूं नये ते करायला गेले, निकाळदरींत गडप झाले !–आतां लायकी दाखवायला कसले येताहेत ते !

**जिजाई :** काय ? काय बोलतां ? माझं मोलाचं माणिक काळानं गिळलं म्हणतां, —आपण हें खरं सांगतां ?

**लाडोजी :** म्हणजे हा इनामदार बच्चा कधीं खरं बोलतच नाहीं असं समजतां कीं काय ?

**जिजाई :** आई, जगदंबे ! अंत तरी किती पाहणार आमचा ? मामंजींच्या स्वप्नांत 'तुझ्या कुलांत छत्रपति निपजेल' असा झालेला साक्षात्कार खोटा होणार काय ? स्वराज्यसूर्योदयाकडे आख्या महाराष्ट्राचे लागलेले डोळे कायम मिटणार कीं काय ?

**दादाजी कोंड० :** [ शिवाजीसह दादाजी कोंडदेव प्रवेश करून ] नाहीं ! नाहीं ! छत्रपति होण्याची लायकी सिद्ध करणारा हा बालरवि आतां आपल्या तेजानं आख्या महाराष्ट्राचे–आख्या भारताचे डोळे उघडणार.

[ शिवाजी जिजाईचे हातीं दुधाचा प्याला देऊन नमस्कार करतो.

**बा. मोहिते :** अहो राजश्री, म्हटलं पुरे झाली ही धूळफेक. वाघाचं म्हणून शेळीचं दूध दाखविणारी ही नजरबंदीची विद्या म्हटलं पुरे झाली. मी म्हणतों, न होणाऱ्या कामांत हात घालावाच कशाला ?

**लाडोजी :** हें पहा, तें तुमचं काम नव्हे. असलीं कामं या इनामदार बच्चांनींच पार पाडावींत.

**शिवाजी** : म्हणजे, वाघाचं म्हणून शेळीचं दूध आणण्याची हातचलाखी तुम्ही केलीत कीं काय ?

**लाडोजी** : बघा हो बाबा, हें दूध शेळीचं म्हणतात. म्हणजे तुम्ही या इनामदार बच्चाला समजला तरी कोण ?

**शिवाजी** : शेळीचं दूध आणणारा शेळपट समजलों.

**लाडोजी** : हां खबरदार, मला शेळपट म्हणशील तर !—

**जिजाई** : थांबा बाळानो, असे एकेरीवर येऊं नका. वाघिणीचं दूध आणणारे सुपुत्र, मातादेवीला प्रियच आहेत. आतां दोघांच्या दुधाचा देवीला नैवेद्य दाखवून छत्रपतीच्या लायकीचा कौल मागूं म्हणजे झालं. दिवाणजी, यांना देवीपुढं नेऊन कौलाची मागणी करा पाहूं.

**दादाजी कोंड०** : बरं आहे मासाहेब. हे आदिमाते, हे उभयता सुपुत्र तुझ्या चरणाजवळ येताहेत, यांपैकीं जो स्वराष्ट्र, स्वधर्म आणि स्वजन जुलमी सत्तेतून सोडविण्यासाठीं हिंदुपद पातशाही स्थापन करण्यास लायक असेल त्याला कौल दे.

[ लाडोजीस देवीपुढें नेऊन बसवितात. कौल देत नाहीं असें पाहून उठून येतो.

**लाडोजी** : छे ! असल्या दगडमातीच्या मूर्ति हालचाल करूं लागल्या तर मग यांना दगडाची कोण म्हणेल ?

**बा. मोहिते** : हं आतां तुमच्या या राजश्रींचा उजेड पडूं दे एकदांचा पाहूं.

[ शिवाजी देवीपुढें बसतो. देवी तरवार देते.

# २

[ १ ]

— **स्थळ** : राजगडावरील शिवाजीच्या वाड्यांतील दालन —

**दादाजी कोंड०** : कां बालराजे, नेहमींची चुळबुळ बंद ठेवून आज स्वस्थसे; कसला विचार चालू आहे ?

**शिवाजी** : कांहीं नाहीं. या आमच्या मोहितेमामांच्या वागणुकीबद्दल विचार करीत होतों. गुरुदेव, मी विचारतों, आमच्याशीं त्यांचं वागणं असं कां बरं असावं ? आणि ते इथं आल्यापासून आमचा एकसारखा द्वेष करूं लागले आहेत, असं कां बरं व्हावं ?

**दादाजी कोंड०** : राजे, हें त्यांचं वागणं म्हणजे त्यांच्या स्वभावाची साक्षच आहे — असं समजावं. स्वाभिमान विसरून परक्या सत्तेस वाहून घेतलेले लोक, देवधर्म, आप्तइष्ट, जातगोत यांना कधींच जाणत नसतात.

**शिवाजी** : मग मी म्हणतों, अशा स्वजनद्रोही आणि देशद्रोही माणसांचा अगोदर समाचार घ्यायला नको का ?

**दादाजी कोंड०** : राजे, कोणत्याहि गोष्टींत उतावळेपणा करूं नये. जें काम करणें त्यांत देशकाल परिस्थिति पाहून आणि आपली शक्ति अजमावून पुढं पाऊल टाकावं. महाभारतादि पोथ्यापुराणांची हीच शिकवण आहे.

**शिपाई :** कोणी पुराणिक आपल्या भेटीची इच्छा करतात.

**दादाजी कोंड० :** जा, त्यांना घेऊन ये. [जातो] राजे, आपणांस पुराणं ऐकण्याचा नाद आहे हें सगळीकडं ठाऊक असल्यामुळं आपल्याकडं हे पुराणिक आले आहेत, त्यांना विन्मुख पाठवूं नये.

**शिवाजी :** होय. गुरुदेव, मलाहि तसंच वाटतं. न जाणो, आजच्या स्थितींत आम्हीं कसं वागावं, हें आज त्यांच्या पुराणांतसुद्धां सांपडेल.

**दादाजी कोंड० :** हो, सांपडेल. खचित सांपडेल – आमच्या पुराणांनीं, धर्मग्रंथांनीं, केवळ राजकारणाचाच विचार केलेला नाहीं — अर्थ, काम, मोक्ष– या सर्व गोष्टींचा सारासार विचार केला आहे. राजकारणाबरोबरच इतर व्यावहारिक शिकवणीकडे कानाडोळा करून चालणार नाहीं. [वेषधारी तुराजी पुराणिक बोवांच्या वेषांत येतो. नमस्कार आशिर्वाद होऊन ] या, असे बसा.

**वे. तुराजी :** म्हटलं आपली कीर्ति ऐकून फार लांबून आलों आहे. आपल्याकडं माझं पुराण व्हावं अशी माझी इच्छा आहे.

**दादाजी कोंड० :** बरें वेळेवर आला. आमच्या राजांना पुराणं ऐकण्याचा बराच नाद आहे. होऊं दे सुरवात. विलंब कां ? मी मासाहेबांना घेऊन येतों. [जातात]

**शिवाजी :** [ओळखून] तुराजी, काय पण बेमालूम सोंग घेतलं आहेस ! कसबी आहेस खरा ! रोहिड्याकडील काय हकीकत आहे ? सगळेजण स्वराज्याच्या शपथा घ्यायला तयार आहेत ना ?

**वे. तुराजी :** नसायला काय झालं ? सगळे लोक अगदीं आपली चातकासारखी वाट पाहात आहेत.

**शिवाजी :** बरं, पण — दादाचा काय निरोप आहे ?

**वे. तुराजी :** ते काय सांगणार ? सारखे डोक्याला हात लावून बसले आहेत. आलेली पाहुणे मंडळी सईबाईची सोयरिक करूनच जाणार म्हणून हट्टाला पेटली आहे. आणि ताईसाहेब म्हणतात कीं, मला जर तिथं दिलं तर जीव ठेवणार नाहीं.

**शिवाजी :** एकंदरींत दादा बराच कैचींत सांपडला आहे म्हणायचा !

**वे. तुराजी :** त्यांना ह्यांतून सोडविण्यास आपणाशिवाय कोण समर्थ आहे ? आतां उघडच सांगतों, त्या दिवशीं त्यांच्या वाड्यांत त्या दुष्टाच्या हातून आपल्याला सोडविणारे तुम्हीच होतां हें जेव्हां आमच्या ताईसाहेबांना समजलं तेव्हां, त्यांनीं

मनाशीं निश्चय करून आपणांस एक पत्र दिलं आहे, तें घेऊन आलों आहे. [ पत्र काढून देतों. इतक्यांत दादोजी कोंडदेव व जिजाबाई आल्याचें पाहून शिवाजी पत्र दडवितो. पुराणिकबुवांचें पुराण सुरू होतें. ] येणेंप्रमाणें जें आहे त्ते रुक्मीणीदेवी ब्राह्मणाबरोबर पत्रिका देऊन द्वारकाधीशांकडं पाठविती झाली.

**जिजाई** : रुक्मिणी–हरणाचं पुराण सुरू आहे वाटतं ?

**वे. तुराजी** : होय मासाहेब. दुष्टाच्या हातून सोडवून नेण्यासाठीं रुक्मिणीदेवींनीं धांवा करतांच सर्व मनोरथ पूर्ण करणारा तो दयाघन प्रभु धांवत जाऊन, जे आहे त्ते, रुक्मिणीदेवीचं पाणिग्रहण करता झाला.

**जिजाई** : काय हो पुराणिक बुवा, भारतीय युद्धांत समरभूमीवर गीता सांगणाऱ्या भगवान् श्रीकृष्णानीं स्त्रियांच्या नाजुक भावनेचाहि अव्हेर केला नाहीं, असंच ना तुमचं म्हणणं ?

**वे० तुराजी** : होय मासाहेब. आपल्या चारित्र्यानं जगाला आपलं कर्तव्य पटवून देणारा तोच हा कर्मयोगी. [ नोकर प्रवेश करतो ]

**शिपाई** : मोहितेमामा आले आहेत.

**दादाजी कोंड०** : [ जिजाई आंत जाते. दादाजी आलेल्या मंडळीस बसवतो ] पुराणिकबुवा, मंडळी आली आहेत तेव्हां थोडं आटपतं घ्या.

**पुराणिक [ वे. तुराजी ]** : ठीक आहे. एकंदरींत जें आहे त्ते–सारांश काय तर, आपल्या सत्कार्याच्या आड स्वजनांपैकीं, भाऊ, काका, मामा जरी आला, तरी त्यांचा चांगला समाचार घेऊन आपलं कार्य तडीस न्यावं, हीच आमच्या धर्माची, जे आहे त्ते शिकवण आहे. हरये नमः हरये नमः हरये नमः।

**शिवाजी** : [ दादोजी आंत जातात हें पाहून ] गुरुदेव, तुम्हीं मामासाहेबाबरोबर थोडं बोलत बसा. बिदागी देऊन मी करतों या पुराणिकबुवांची संभावना.

[ आंत जातो.

**पिराजी** : होय तर, हे पुराणबहादूर पुराणांतील आधारावर बोट ठेवून दिशाभूल करतात आणि कोवळीं कोवळीं मुलं बळी देऊन मोकळे होतात. तेव्हां यांचाच अगोदर बंदोबस्त केला पाहिजे.

**बा. मोहिते** : बादशहाविरुद्ध माजविलेल्या काहुरास या भटांचीहि बरीच उठावणी आहे म्हणायची.

**लाडोजी** : हें बघ पिराजी, दादा आटोपून मला एकदां मुखत्यारी मिळाली कीं, हा इनामदार बच्चा, जर सच्चा असेल तर, अगोदर या भटांचीं वतनं खालसा करील नि तीं काजींना देईल पण या पाजींना देणार नाहीं !

**वे. तुराजी** : नाहीं, तसें तुम्ही पुण्यशील आहांतच म्हणा !

**दादाजी कोंड०** : जाऊं दे हो. त्या बिचाऱ्यानं काय केलं आहे ?

**बा. मोहिते** : आणखीन् काय करायचं ठेवलं आहे ? पुराणं सांगून त्यांतील अर्जुनाप्रमाणं संन्यास घ्यायला लावून सुभद्राहरणाचे प्रयोग सुरू केले आहेत ना ! तुम्हांला दिसतं कुठं ?

**लाडोजी** : होय ! असाच एक बोकेसन्याशी – का रामदासी – येऊन माझ्या भावी पत्नीला पळवून नेत होता. पण जेव्हां का या इनामदार बच्चाच्या अंगांतलं पाणी त्याला दिसलं तेव्हां मग तो तिथं राहतो कसला ? – बेट्यानं पोबारा केला.

**वे. तुराजी** : काय, आपल्या अंगांतलं पाणी पाहून त्यांनीं पोबारा केला ?

**लाडोजी** : नाहीं तर–डोळ्यांतलं पाणी पाहून म्हणतां कीं काय ?

**बा. मोहिते** : हें पहा दादाजी, आम्ही या प्रांतीं आल्यापासून बारकाईनं तपास केला. समजलेल्या माहितीवरून इकडील प्रकार कांहीं ठीक दिसत नाहीं. तेव्हां म्हटलं थोडं सांभाळून असा, इतकाच इशारा देऊन ठेवतों. शहाजीराजांनीं तुम्हाला विश्वासू समजून जहागीर व मुलगा तुमच्या स्वाधीन केला आहे.

**दादाजी कोंड०** : होय. ती जबाबदारी मी पूर्ण ओळखून आहें. आणि म्हणूनच त्यांचे इच्छेविरुद्ध कोणतीहि गोष्ट न घडण्याची मी खबरदारी घेतों.

**बा. मोहिते** : एकूण बादशहाविरुद्ध असे पुंडावे करण्याची त्यांचीहि इच्छा आहे असं म्हणतां कीं काय ? अहो गुरु, आमच्याजवळ बोललांत तेवढं पुरे, असेच दुसऱ्याजवळ असं कांहीं तरी बहकाल आणि राजांच्या गळ्याला फांस लावाल !

**दादाजी कोंड०** : आम्ही करीत असलेल्या बंदोबस्ताच्या कामगिरीस आपण पुंडावे समजतां ना, नाइलाज आहे. एकंदरींत तुमच्या बोलण्यावरून तुम्ही शहाजीराजांना ओळखलं नाहीं असं दिसतं. आपल्या देशाचं रक्षण करायला आपण समर्थ झालं पाहिजे, अशीच त्यांची इच्छा आहे. त्याप्रमाणें देशांतील प्रत्येक प्रांतानं, घटकानं जबाबदारी ओळखून प्रयत्न केला तर ती साम्राज्याला एक प्रकारें मदतच नाहीं का होणार ?

**बा. मोहिते** : तुमच्या बरोबर किती जरी डोकेफोड केली तरी पालथ्या घागरीवर पाणी होणार आहे. [ शिवाजी नारळ व मोहोरा पुराणिकबुवांस देतो.—नारळांत पत्र असल्याची खूण करतो. पुराणिक जाऊं लागतो. ] अहो पुराणबहादूर, असे चालला काय ? या गुरुजीनं बादशाहीविरुद्ध उठायचं शिक्षण दिलं, आतां तेवढा वाघाबरोबर युद्ध खेळण्याचा ळवांकुशाचा आधार तुम्ही दाखवा, म्हणजे तुमची कामगिरी बरोबर झाली असं म्हणायला हरकत नाहीं.

**शिवाजी** : ताटाची तयारी आहे, मासाहेब आपली वाट पाहात आहेत.

**दादाजी कोंड०** : हं चला साहेब, अगोदर जेवण करा. मग आणखी तुम्हाला आम्हांला सांगायचं असेल तें सांगा.

**बा. मोहिते** : आम्ही कांहीं तुमच्या इथं जेवायला आलों नाहीं ! हो, बेमानाच्या घरीं अन्न घेतलं तर आम्हालाही तशी बुद्धि व्हायची.

**शिवाजी** : मामासाहेब, कोण बेमानी ? आम्ही का तुम्ही,? स्वकीयासाठीं धडपड करणारे बेमानी, नि स्वकीयांना लाथा मारून परक्याच्या पायीं माथा टेवणारे इमानी !

**बा. मोहिते** : अहो स्वकीय स्वराज्यसेवक, तुम्ही काय उजेड पाडणार तो पाडा म्हणा – पण दुसऱ्यांचीं घरंदारं उजाड करून त्यांच्या अन्नांत माती कालविण्याची पुण्याई बांधून घेऊं नका.

**दादाजी कोंड०** : मामासाहेब, असं काय बोलता हें ? आमच्या राजानं कुणाच्या अन्नांत माती कालविली म्हणतां ?

**बा. मोहिते** : कुणाच्या ? त्या रोहिडखोऱ्याच्या देशपांड्याच्या. दादाजी प्रभूच्या घराच्या इमानदारीबद्दल बादशाहींत केवढा लौकिक — पण या राजश्रीच्या शिकवणुकीमुळं त्याच्या वतनवाडीची धूळधाण होण्याची वेळ आली आहे. आणि विशेष दुःखाची गोष्ट म्हणजे, बादशाही हुकमानं त्याचा बंदोबस्त करण्याचा प्रसंग माझ्यावर आला आहे. त्या बंडखोर निंबाळकराची काय दशा झाली हें प्रत्यक्ष डोळ्यांसमोर असतां दादाजीनं असं वागायला नको होतं.

**पिराजी** : होय, बिचारा असल्याच कुणाच्या शिकवणीनं बादशाहीशीं बेमान झाला आणि जहागिरीला मुकून तुरुंगांत जाऊन पडला.

**बा. मोहिते** : खरोखर त्या वेळीं त्यांना तशी दुर्बुद्धि झाली नसती तर त्याच्या एकुलत्या मुलीला देशोधडीस लागून परक्याच्या दारीं पडण्याची वेळच आली

नसती. बाकी, ती पोरटीहि तसलीच म्हणा. परदेशीं पोर आमच्या घरीं पडावी म्हणून आमच्या जिवाची कोण आटापीट चालली आहे ? पण तिला आहे का त्याचं ! तिनं तर भलते सलते थेर आरंभल्याचं कानावर येऊं लागलं आहे.

**लाडोजी :** ती करील थेर पुष्कळ, पण हा इनामदार बच्चा चालू देईल तेव्हां ना ? तिला वाटतं हा इनामदार बच्चा कच्चा असेल, पण सांभाळून राहा म्हणावं. बाबा, लग्नाचा मुहूर्त येईपर्यन्त तिला त्या दादाजीच्या घरीं ठेवायचीच नाहीं. नाहीं तर हा शिवाजी कांहीं तरी घोटाळा करून माझी बायको पळवील.

**शिवाजी :** काय बोललास ? पुन्हां बोल पाहूं !

[ अंगावर जातो. त्यांस दादाजी मागें ओढतो

**दादाजी कोंड० :** राजे, थोडं तोंड बंद ठेवा पाहूं. हे आपल्या घरीं पाहुणे म्हणून आले आहेत, तेव्हां ते कांहीं जरी बोलले तरी त्यांच्या मनाला लागेल असं आपण बोलणं हा आपला धर्म नव्हे. तुम्ही आंत मासाहेबाजवळ जाऊन बसा पाहूं !

[ शिवाजी आंत जातो

**लाडोजी :** बाबा, कसलाहो हा शेळपट शिवाजी. त्यांनीं आंत जा म्हणतांच खालीं मान घालून आंत जाऊन बसला ! आपल्याला नाहीं बुवा हा असला सासुरवास खपणार. माझ्या बापाचा बाप जरी आला तरी हा इनामदार बच्चा असलं कांहीं सहन करणार नाहीं.

**बा. मोहिते :** दादाजी, तुमच्या या बाळानं चालविलेलीं कारस्थानं आम्हांला कळत नाहींत असं समजतां कीं काय ?

**दादाजी कोंड० :** पण आमच्या राजानं काय केलं तें मात्र तुम्ही मुळींच सांगत नाहीं. मोघम बोलण्यावरून काय समजावं ?

**बा. मोहिते :** तुम्हांला समजलं नाहीं, म्हणून तर सांगायला इथं आलों आहों. तुमचे हिन्दवी स्वराज्यसंस्थापक राज्य मिळविण्याच्या अगोदर राज्याभिषेकास राणी मिळविण्याच्या खटपटींत आहेत. पडला का प्रकाश ? चोरून कशाला, स्पष्टच सांगतों. निंबाळकरांच्या सईबाईबरोबर आम्ही सोयरीक जमवीत असतां त्यानं वेषांतर करून तिला पळवून नेण्याचा घाट घातला होता.

**लाडोजी :** पण, या इनामदार बच्चानं त्यालाच पळता भुई थोडी केली.

**बा. मोहिते :** तुमच्या त्या पुराणांतील सुभद्राहरणाच्या पारायणाचाच हा परिणाम, दुसरं काय ? गुरुदेव, चांगलं शिक्षण सुरू ठेवलं आहेत बरं !

**लाडोजी** : पण लक्षांत ठेवा, आमच्याशीं गांठ आहे. जाणूनबुजून शेपटीवर पाय ठेवीत आहांत.

**बा. मोहिते** : दादाजी, तुम्हांला पुन्हां पुन्हां बजावून ठेवितों कीं, शहाजीराजानं विश्वासू समजून जहागीर व मुलगा तुमच्या हवालीं केला आहे. असल्या पुंडाईमुळं जर कांहीं बरंवाईट झालं तर तुम्हांला जबाबदार धरलं जाईल, हें पक्कं लक्षांत असूं दे. [ जातात

**शिवाजी** : [ प्र. क. ] गेलीं वाटतं पाहुणे मंडळी ? गुरुदेव, बोलत का नाहीं तुम्ही ? न जेवतां पाहुणेमंडळी गेली म्हणून वाईट कां वाटतं आपल्याला ?

**दादाजी कोंड०** : नाहीं, त्यांच्या जाण्याबद्दल वाईट वाटत नसून त्यांनीं सांगितलेल्या हकिकतीबद्दल वाईट वाटतं.

**शिवाजी** : काय सांगितलं त्यांनीं ?

**दादाजी** : राजे, आपल्याला स्पष्टच विचारतों. या लोकांनीं सईबाईबद्दल सांगितलं तें खरं काय ? आणि हें जर खरं असेल तर केवढा लोकापवाद आपल्यावर येईल याची जाणीव आहे का ?

**शिवाजी** : गुरुदेव, आपल्याला मी कधींहि खोट सांगणार नाहीं. एका अबलेचा – कुमारिकेचा डोळ्यादेखत चाललेला छळ माझ्याच्यानं पाहवला नाहीं. पण त्या वेळीं गांजलेल्याला दुःखमुक्त करण्यापलीकडं माझ्या ठिकाणीं कसलीहि भावना नव्हती.

**कलगी** : [ धांवत येऊन ] राजे, धांवा हो धांवा, गरीब गाईचं रक्षण करा.

**दादाजी कोंड०** : अग काय झालं – काय आहे ?

**कलगी** : मोहित्याच्या लोकांनीं दादाजीस त्यांच्या वाड्यांत विश्वासघातानं पकडून त्यांना कैद करून घेऊन गेले आणि ताईसाहेबांना वाड्यांत कोंडून ठेवून त्यांच्यावर पहारा बसविला आहे.

**शिवाजी** : गुरुदेव, बोला. अशा वेळीं मीं काय करावं ? माझा सहकारी प्रत्यक्ष काळमुखांत लोटला जात असतां लोकापवादाच्या बागुलबुवाला भिऊन गांजलेल्यांना दुःखमुक्त करण्याचं ब्रीद मीं सोडून द्यावं ?

**दादाजी कोंड०** : तें ब्रीद राखण्यासाठीं, आमच्यासारखीं माणसं पदरीं असतां, बाळराजांना जातीनं भाग घेण्याचं कारण काय ? त्यांना मी सोडवून घेऊन येतों.

**शिवाजी :** गुरुदेव, प्राण पणाला लावून कर्तबगार राजा होण्याची सोन्यासारखी संधि घालवून, सोन्याच्या अंबारींत बसून मुजरे घेणारा ऐतखाऊ राजा तुमच्या मनांतून मला बनवावयाचा आहे ? [ जिजाई येते

**जिजाई :** [ प्र. क. ] काय चाललं आहे ? काय म्हणतात बाळराजे ?

**दादाजी कोंड० :** मोहित्याच्या लोकांनीं दादांना पकडून, सईबाईस वाड्यांत कोंडून ठेवलं आहे. त्यांना जातीनं सोडवून आणण्याचा बाळराजांचा हट्ट आहे. मी जातों म्हटलं तर ऐकत नाहींत.

**जिजाई :** एकंदरींत त्यांचीं नीच कारस्थानानं इतक्या थराला गेलीं म्हणायचीं !

**शिवाजी :** मासाहेब, द्या ना परवानगी ?—सांगा ना गुरुदेवांना ? एकेक क्षण फार मोलाचा चालला आहे.

**दादाजी कोंड० :** मासाहेब, वीरश्रीच्या भरांत तरुणांना मनाचा तोल सांभाळण्याचं भान राहात नाहीं. हिंदवी स्वराज्याच्या आधाराला प्राणापलीकडं जपायला नको काय ?

**जिजाई :** तुमचं स्वामिनिष्ठ मन आणि माझं मायेचं मन यापेक्षां काय चिंतणार ? तरी पण बाळहट्टाकडं थोडं लक्ष द्यायला नको का ? समरभूमीचं शिक्षण असल्या छोट्या छाप्यांतूनच मिळतं.

**दादाजी कोंड० :** मग मला तरी त्यांचेबरोबर हजर राहाण्याची परवानगी असावी.

**जिजाई :** जा, तुम्ही त्यांचेबरोबर असला म्हणजे मग काळजीचं कारणच नाहीं. कलगी, तूं सईताईला इकडील हकीकत कळवून धीर दे. जा लौकर. [ कलगी जाते ] बाळ, मोहिते हे तुझे मामा आहेत हें थोडं लक्षांत ठेव हं.

[ शिवाजी जिजाईचा निरोप घेऊन जातो.

[ घोड्यावर बांधून दादाजीस घेऊन चालले आहेत. शिवाजी पाठलाग करून झटापट होते व दादाजीस सोडवून आणतात.

— स्थळ: — दादाजी प्रभूच्या वाड्याची देवडी —

**पिराजी :** [ पहारा चालू असतां कलगी प्रवेश करते ] हं ! कुठं निघालीस, परवानगीशिवाय आंत जायचं नाहीं.

**कलगी :** म्हणजे, आपल्या माणसाला भेटायलासुद्धां परवानगी लागते वाटतं ?

**पिराजी :** आतां तुम्ही ज्या माणसाला भेटायला जाणार, तें माणूस तुमचं नसून आमच्या लाडोजीरावचं आहे.

**कलगी :** असं कसं म्हणतां ?–अक्षता पडेपर्यंत तें माणूस आमचंच आहे.

**पिराजी :** तें कांहीं जरी असलं तरी, तुला तुझ्या ताईसाहेबाकडं जातां यायचं नाहीं. कुणाला आंत न सोडण्याबद्दल माझ्या धन्याची मला सक्त ताकीद आहे.

**कलगी :** त्यांना भेटायचं राहूं दे, पण आमच्या धन्याच्या माणसांना मला भेटायला काय हरकत आहे ? कां त्यांनाहि भेटायला बंदी आहे ?

**पिराजी :** अग, पण तुझ्या दादाजीचीं माणसं वाड्यांत असतील तर त्यांना भेटायची गोष्ट ! दादाजीला पकडून नेल्याबरोबर त्याच्या बायकापोरांनीं केव्हांच आपल्या माहेरची वाट सुधारली. त्या तुझ्या ताईसाहेबालाहि घेऊन चालल्या होत्या, पण आमच्या धन्यांनीं त्यांना न सोडतां इथं ठेवून घेतलं आहे.

**कलगी :** म्हणजे, जवळ जवळ कैदच केलं आहे असं म्हणाना ?

**पिराजी :** एकूण तूं लग्नाला कैदच समजतेस कीं काय ? आणि म्हणूनच अजून लग्नाच्या भानगडींत पडली नाहींस वाटतं ? बरं,–तें राहूं दे. कलगी, बरेच दिवस विचारीन विचारीन म्हणतों, पण संधिच आली नाहीं. मी म्हणतों, लग्नाशिवाय तुझ्या आईबापांनीं तुला एवढी वाढविली तरी कशी ?

**कलगी :** हें पहा, त्यांची त्याबद्दल सारखी घाई आहे. पण ताईसाहेबांची ताटातूट होईल म्हणून, तूर्त माझीच इच्छा नाहीं.

**पिराजी :** एकूण, ताईसाहेबांची नि तुझी ताटातूट न होण्याजोगा नवरा मिळाला तर त्याच्याबरोबर लग्न करायला तूं तयार आहेस असं म्हणायला हरकत नाहीं.

**कलगी :** तसं जर काय साधत असेल, तर त्याबद्दल थोडा विचार करीन.

**पिराजी** : तुला आतां असा विचार करायची वेळ आलीच आहे. नाहीं तरी तूं थोडीच मुरळी होणार आहेस ? हें पहा, तुझ्या मनाप्रमाणं एक योग जमून आला आहे. चोरून कशाला ठेवूं ? स्पष्टच सांगतों – लाडोजीरावांबरोबर तुझ्या ताईसाहेबांचें लग्न होणार आहे. आणि त्यांचा मी खास तैनातदार आहे. तेव्हां म्हटलं, माझ्याबरोबर लग्न केलंस म्हणजे सर्व कांहीं तुझ्या मनाप्रमाणं होईल कीं नाहीं – सांग बरं ?

**कलगी** : एकदां सांगितलं ना मीं, पुन्हां पुन्हां काय विचारायचं ?

**पिराजी** : अग, उद्यां इथं माझी गांठ पडेलच असा नियम नाहीं. तुझ्या ताई-साहेबांबरोबर कदाचित् आजच माझी रवानगी होईल. म्हणून म्हणतों...

**कलगी** : मग जिथं तुम्ही असाल तिथं मी येईन. कुठं यायचं ती जागा सांगून ठेवा म्हणजे झालं.

**पिराजी** : तें ठिकाण फार गुप्त आहे. कुणाला सांगायचं नाहीं.

**कलगी** : अहो, पण सांगितल्याशिवाय मला कळणार कसं ? एकूण तुमच्या शोधासाठीं मला वणवण फिरविण्याचा तुमचा विचार आहे वाटतं ? आत्तांच जर असं, तर मग पुढं कसं ?

**पिराजी** : तसं नव्हे ग, बायकांच्या स्वभावाप्रमाणं सहज कुणाजवळ बोलशील नि माझ्या गळ्याला फांस लावशील !

**कलगी** : इतका का माझ्यावर विश्वास नाहीं ! मग कशाला राहायचं इथं ?

[ जाऊं लागते

**पिराजी** : अग, अग, थांब. सगळं सांगतों; अशी रागावूं नकोस. तो तोरणा किल्ला नाहीं का, त्या किल्ल्यांतील एका बुरजाखालच्या तळघरांत, त्यांना ठेवण्याचा बेत आहे. तिथं माझाच पाहारा आहे. समजलं ? पण, यांतील एक अक्षरहि बाहेर फुटतां कामा नये, बरं का ?

**कलगी** : मी कांहीं अशी तशी नाहीं, मला तुम्ही चांगली ओळखली नाहीं. तुम्ही आम्हा बायकांना काय समजतां ?

चंचल पुरती, जगिं युवति जात समजती ॥
कवि वरळति, जन परिसति, नवलही बाई गति ॥ ध्रु० ॥
डोळ्यामधुनी भेदक पाणी, ओठावरती मादक वाणी ॥
धुसफुस मुसमुस, लगट, विनवणी मायिक ही म्हणती ॥

काहीं म्हणा कुणी, आम्ही पुरेपणीं, नाहिंच अजुनी,
पुरुषां कळुनी आलों या जगतीं ॥
गहजब कां, मग इतुका, उगिचचि निंदा कशी करती ॥ १

[ वेषधारी पुराणिक प्रवेश करतात ] या, पाया पडते.

[ वेषधारी पुराणिक वाड्यांत जाऊं लागतो

**पिराजी :** अहो ! अहो !! अगदीं आपल्या बापाचं घर असल्यासारखं बेलाशक घरांत घुसतां की ?

**वे. तुराजी :** हो, हा वाडा आम्हाला अगदीं स्वतःच्या घरासारखाच वाटतो. आणि या वाड्याचे धनी आम्हाला मायबापासारखेच वाटतात. पण मी म्हणतों, आमच्यासारख्या विद्वान् ब्राह्मणाला मज्जाव करून उगीच कां पदरांत पाप बांधून घेतां ?

**पिराजी :** अहो महाराज, तुमच्या या पापाला भिऊन आंत सोडण्याचं पुण्य केलं, तर लौकरच मला स्वर्ग मिळेल ना ?

**वे. तुराजी :** पण तुम्ही असे कां घाबरतां ? आम्ही आहोंत ना ?

**पिराजी :** कशाला ? बारावं करायलाच ना ! तें कांहीं नाहीं, फिरा पाहूं मागं, निं व्हा कसें येथून चालते.

**वे. तुराजी :** बरं आहे बाबा, जातों मी इथून ?

**कलगी :** पुराणिकबुवा, थोडं थांबा; मी काढते यांची थोडी समजूत. हें पहा, आमच्या ताईसाहेबांची देव – ब्राह्मणावर फार श्रद्धा आहे. दारीं आलेल्या ब्राह्मणाला त्यांनीं कधींच विन्मुख केलं नाहीं. तेव्हां त्यांचं हें अखंड व्रत मोडायला तुम्ही कारण झालांत तर पुढं जड जाईल. मालकीण झाल्यावर तुम्हाला नोकरीवर तरी ठेवतील का याचा थोडा विचार करा.

**पिराजी :** एकंदरींत तूं मला पेचांत घातलंस खरं !

**कलगी :** काय, मीं तुम्हांला पेचांत घातलं ? असं जर आहे तर मी आपली कशाला राहूं इथं ! जातेच कशी.

**पिराजी :** अग, अग, अशी रागावून जाऊं नकोस. तुला काय सांगावं — अग ही नोकरी म्हणजे सुळावरील पोळी आहे बरं – तेव्हां मला थोडा विचार करायला

नको का ? बरं. मी म्हणतों, हुकमाप्रमाणं यांना आंत न सोडतां, ताईसाहेबांनाच इकडं आणलं तर ?

**कलगी** : छान ! युक्ति पण युक्ति !! मला वाटलं आपल्याला डोकं नाहीं. पण आहे, आहे ! एकंदरींत डोकं आहे खरं.

**पिराजी** : कोण समजतेस तूं मला ? या डोक्यावरच मोहित्यांची सुभेदारी टिकली आहे, समजलीस ?

**कलगी** : बरं, पण यांना कां तिष्ठत ठेवलं आहे. बोलावून आणा पाहूं आमच्या ताईसाहेबांना. [ पिराजी जातो ] [ वे. तुराजीस ] नाहीं, नाहीं, मी काय तुम्हाला ओळखलं नाहीं असं म्हणतां होय ?

**वे. तुराजी** : ओळखीच्या माणसाची खूणगांठ ओळखीच्याच माणसाला ठाऊक असायची. मला वाटलं, माझ्याकडं पाहून कुठं खुदकन् हंसून माझं सोंग बाहेर काढतेस कीं काय ! हें पहा, [ नारळांतील पत्र काढून दाखवून ] शिवाजी-राजानं दिलेलं हें पत्र ताईसाहेबांना पोहोंचवावयाला आलों आहे. [ पिराजी सईबाईस घेऊन येतो. पुराणिकास सईबाई नमस्कार करते. पुराणिक आशीर्वाद देतो. ' इच्छित वर लाभो, अखण्ड सौभाग्य प्राप्त होवो ' ]

**सईबाई** : आपल्यासारख्यांच्या तोंडून पुराण ऐकण्याची फार इच्छा होती. पण, या स्थितींत माझं कांहीं चालत नाहीं. आजपर्यंत कोणाहि ब्राह्मणाला विन्मुख पाठविलं नाहीं. माझ्या हातीं आहे तेवढा धर्म करते. त्यांतच संतोष मानून घ्यावा. [ हातांतील सोन्याचें कांकण वेषधारी पुराणिकास देते.

**वे. तुराजी** : हे धर्मपरायण पुण्यशील कुमारिके, तुझ्या पोटीं प्रत्यक्ष धर्मावतार जन्म घेईल. [ असें म्हणून जवळचा नारळ ओट्यांत घालीत असतां पिराजी नारळ काढून घेतो, सईबाई नुसता नमस्कार करून रागानें आंत जाते. ]

**पिराजी** : [ कलगीस ] हें पहा, असं वाईट वाटून घेऊं नका. कोणासहि आंत जाऊं न देण्याची मला सक्त ताकीद आहे. त्यांत, नारळ हा पुरुषवाचक पदार्थ, तेव्हां या शेंडीवाल्याला – नारळस्वामींना कसा सोडावा, म्हणून काढून घेतला.

**वे. तुराजी** : सत्तेपुढं शहाणपण काय चालणार ? [ जाऊं लागतो.

**पिराजी** : अहो शिष्ट, चालला कुठं, माझा नव्हे माझ्या बापाचा माल म्हणून घेऊन चालला कुठं ? इथं ठेवा तो माल आणि मग रस्ता धरा.

**वे. तुराजी** : अहो पण, ऽऽ...

**पिराजी :** पण बीण तें कांहीं नाहीं. मुकाट्यानं तें कांकण दे. हें पहा, जर कां तें कांकण लौकर दिलं नाहींस तर याच तुझ्या नारळानं तुझं टक्कुरं फोडून कपाळमोक्ष करीन. काढ, [ नारळ उगारतो ] काढ मुकाट्यानं, नाहीं तर टक्कुरं फुटलंच म्हणून समज.

**कलगी :** पुराणिकबुवा, कशाला करतां उगीच हमरीतुमरी; देऊन टाका तें कांकण आणि जा कसें मुकाट्यानं !

**वे. पुराजी :** असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ ! [ कांकण देतो

**कलगी :** हें पहा, देवानं दिलं नि कर्मानं नेलं, असं समजून जा कसे आधीं इथून मुकाट्यानं. [ वे. पुराणिक जातो

**पिराजी :** पाहिलास का या पठ्ठयाचा पराक्रम ! माझ्या नुसत्या दरडावण्याची ही मिळकत. आणि माझ्या कृतीची मिळकत पाहशील तर डोळे दिपून जातील – आहेस कुठं तूं ?

**कलगी :** नाहीं; अजून मी मृत्युलोकांतच आहे. तुमच्याशीं लग्न केल्यावर मगच तें स्वर्गसुख मिळणार आहे मला.

**पिराजी :** मग आपल्या लग्नाचं ठरलं असं म्हणायला कांहीं हरकत नाहीं ?

**कलगी :** पण ताईसाहेबांच्या कानावर घालायला नको का ? मग आंत ताईसाहेबांकडं जाऊन विचारून येऊं का ?

**पिराजी :** हें पहा, तुझ्याच मनाचा निश्चय असल्यावर उगीच कोण कशाला आड येईल.

**कलगी :** हें पहा, मीं काहीं तरी ठरवावं, आणि तुम्हीं मला तोंडघशीं पाडावं असं नाहीं ना होणार ?

**पिराजी :** आतां तुला काय सांगावं ?

**कलगी :** खरं तेंच सांगावं ! तुमच्या मनाचा झाला ना धडा, मग लग्न ठरलं म्हणून करा पाहूं साखरपुडा !

**पिराजी :** अग, ठरलं – ठरलं !! तो तुझा साखरपुडा झाला म्हणून समज !

**कलगी :** अंहं; साखरपुडा असा तसा होत नसतो. साखरपुड्याला एखादा दागिना घालायचा असतो.

**पिराजी** : आलं, आलं—एकंदरींत तुझं धोरण लक्षांत आलं. अग, तुला देण्यासाठींच तो मिळविला आहे. घे हें, मग तर झालं ? [ कांकण देतो

**कलगी** : खरंच, मला काय वाटतं सांगूं का ?

हौस माझी, लेवुन लेणीं, जिवलगाला, रंजवावें ॥ ध्रु० ॥
दूर जावें, जवळि यावें, घडिघडीला हसुनी, रुसुनी, रमवावें ॥ १ ॥
नांव घ्यावें, मूक व्हावें, भरुनी ओटी ठुमकत ठुमकत मिरवावें ॥ २ ॥

[ पदाचे शेवटीं तेथील नारळ ओटींत घेऊन आंत जाते

[ ३ ]

—**स्थळ**—दाजी प्रभूचा वाडा —

**सईबाई** : [ नारळांतील पत्र काढून ] पत्रिके, तूं सांगतेस त्याप्रमाणं, खरोखरच का त्यांनीं आपल्या हृदयांत मला जागा दिली आहे ? त्यांच्या हृदयाचा ठाव घेऊनच तूं मला सांगतेस ना ? सांग ना, पुन्हां पुन्हां सांग, तूं घेऊन आलेला निरोप, पुन्हां पुन्हां ऐकावासा वाटतो. काय ? ‘ दुःखमुक्त करण्याचं ब्रीद आहे.’ मग मी दुःखी नाहीं असं कां वाटतं ? बरोबर आहे. माझ्या दुःखाची कुणाला कशी कल्पना येणार ? आणखिन् काय ? ‘ ज्याचा भाव आहे जैसा । तयास लाभ होई तैसा.’ एकंदरींत माझ्या भावनेबद्दल शंका दिसते स्वारींना ! पण मी अगदीं खरं खरं सांगते हो, कीं मी तशी नाहीं म्हणून. माझ्या भावाचे तुम्ही एकच देव आहांत बरं — तसं कशाला, तुमच्या या पत्रिकेला साक्षी ठेवून प्रतिज्ञा करते बरं—मग तर झालं [ कुंकवाचा करंडा आणते ] पत्रिके, अगोदर तुला कुंकुममंडित करून, खऱ्या भावानं त्यांच्या नांवचं सौभाग्य अलंकाराचं लेणं लेते.

[ लाडोजी येत आहे असं पाहून पत्र करंड्यांत दडवते.

**लाडोजी** : [ प्र. क. ] कां ? कसला विचार चालला आहे;—प्रकृति बरी आहे ना ?

**सईबाई** : माझी प्रकृति बिघडली आहे असं का कुणी सांगितलं ?

**लाडोजी** : नाहीं. खाणं नाहीं, पिणं नाहीं, बोलणं नाहीं, हंसणं नाहीं, म्हणून म्हणतों ! बरं तें जाऊं दे. मग काय ठरला विचार ? हें पहा, हा इनामदार बच्चा अक्कलहुशारीनं विचारतो आहे कीं, तूं राजीखुशीनं लग्नाला तयार आहेस ना ?

**सईबाई** : हें पहा, मी तुम्हाला निक्षून सांगतें, माझ्या वडिलांची नि भावाची त्या बादशहाच्या तडाख्यांतून सुटका झाल्याशिवाय, मी कोणत्याच गोष्टीचा विचार करणार नाहीं.

**लाडोजी** : हं ! त्यांची सुटका करायला काय उशीर ? एकदां लग्न तर उरकूं दे म्हणजे दाखवतो माझा पराक्रम. अग, असलीं कामं म्हणजे ह्या इनामदार बच्चाच्या हातचा मळ आहे. आमच्या घराण्याचा लौकिक तुला माहीत नाहीं वाटतं ?

**सईबाई** : नसायला काय झालं ? माझ्यासारख्या अबलेला कोंडून ठेवणाऱ्या घराण्याचा लौकिक केव्हांच दिसून आला आहे.

**लाडोजी** : हें बघ, नांवलौकिकास चढलेल्या घराण्याला अशीं नांव ठेवूं नकोस. कारण त्या घराण्यांतच तुला जन्म काढावयाचा आहे. बादशहांनीं उगीच नाहीं आम्हांला गांवं इनाम दिलीं ? आमच्या पूर्वजांचे पराक्रम ऐकले नाहींस वाटतं ?

**सईबाई** : ऐकायला कशाला पाहिजेत, त्या पूर्वजांच्या वंशजांचे पराक्रम ढळढळीत डोळ्यांना दिसतच आहेत. आणखी ऐकायला कशाला पाहिजेत !

**लाडोजी** : अग, आमची तर गोष्ट राहूं दे—आमच्या आजोबांचा पराक्रम ऐकशील तर थक्क होशील. हें बघ, ते बादशहाच्या घोड्याची रिकीब धरून दहा दहा कोसांची दौड मारीत होते. आहेस कुठं तूं ?

**सईबाई** : म्हणजे ?—ते मोतदार होते कीं काय ?

**लाडोजी** : अग, त्यांना मोतदार म्हणायचं नसतं, मोठे हुद्देदार म्हणायचं असतं. त्यांची ती गोष्ट तर राहूं दे, प्रत्यक्ष माझे, या इनामदार बच्चाचे वडील कांहीं कमी पराक्रमी नाहींत—बादशहाच्या भेटीसाठीं तीन तीन दिवस अन्नपाण्यावांचून खडे असतात ! आहे का अशी छाती कुणाची ?

**सईबाई** : एकंदरींत दरबारांत आपलं बरंच वजन आहे म्हणायचं ?

**लाडोजी** : हें बघ, आतां शिवाजीचा कांटा काढण्याची हातीं घेतलेली कामगिरी पार पडली कीं, वाटेल त्या वेळीं बादशहची भेट झालीच म्हणून समज. आणि मग तुझ्या वडलांची नि भावाची सुटका व्हावयाला काय उशीर ?

**सईबाई** : इतकं करून बादशहानं नाहीं ऐकलं तर ?

**लाडोजी :** काय ?—नाहीं ऐकलं तर ? अर्ज, विनंत्या, विनवण्या यांचा बादशहांच्याच चरणाजवळ ढीग पाडीन ! इतकंहि करून त्यांना दया नाहीं आली तर, हा इनामदार बच्चा त्यांच्या चरणावर गडबडा लोळण घ्यायला कमी करणार नाहीं. मग तरी काम होईल कां नाहीं ? बोल.

**सईबाई :** हें पहा, अशा तऱ्हेनं माझ्या वडिलांची सुटका होण्यापेक्षां न झालेली बरी असं मला वाटतं.

**लाडोजी :** मग कशा तऱ्हेनं सुटका करूं तें तरी सांग.

**सईबाई :** माझ्या वडिलांची सुटका डोळ्यांच्या पाण्यावर न होतां, तरवारीच्या पाण्यावर झाली पाहिजे. आणि तुमच्या बोलण्यावरून तुमच्यांतलं पाणी केव्हांच कळून आलं आहे.

**लाडोजी :** हें पाहा, या जातिवंत इनामदार बच्चाच्या अंगांतलं पाणी दाखवूनसुद्धां, तुझ्या वडिलाला आणि भावाला सोडवून आणायला कमी केलं नसतं. पण तसं करण्यांत आम्हाला काय फायदा ? त्यांना सोडविलं नि ते इथें आले तर, त्यांची जहागिरी आम्हाला कशी मिळणार ? तुझ्याबरोबर लग्न करून तुझ्या नांवानं झालेली ती जहागिरी आमच्या घराण्यांत आणण्याची तर आमची खटपट आहे.

**सईबाई :** एकूण येवढ्यासाठींच तुमच्या खटपटी लटपटी चालू आहेत ? मला काय ठाऊक, आतां मात्र जन्माची सुखी होणार खरी मी !

**लाडोजी :** यांत काय संशय ! ती जहागीर मिळण्याचाच अवकाश, तुला अगदीं सात पडद्यांत ठेवीन. सूर्यालासुद्धां तुझं दर्शन होऊं देणार नाहीं मी. काय सांगूं, तुला त्या वेळीं असं वाटेल कीं, जणूं काय आपण खानाची बिब्बीच आहोत कीं काय—आहेस कुठं तूं ?

**सईबाई :** आहे,—मी अगदीं स्वर्गसुखांत आहे बरं !

**लाडोजी :** पण या आनंदाच्या भरांत मी इथें कां आलों होतों हें सांगायला विसरलोंच. हें पहा, लग्नाच्या मुहूर्ताला थोडा अवकाश आहे. तेव्हां तुला कोणत्या दागिन्यांची आवड आहे हें तुला विचारूच दागिने करायला द्यायचं ठरविलं आहे मीं. तेव्हां बोल, तुला हिऱ्याचे, मोत्याचे कां पाचूचे—कोणते अलंकार आवडतात ?

**सईबाई** : खरं सांगू कां? मला सौभाग्यालंकारापेक्षां कोणताच अलंकार आवडत नाहीं.

**लाडोजी** : सौभाग्य अलंकार म्हणजे कुंकूच ना? अग, त्याला काय.तोटा आहे. [ करंडा घेऊन ] हा पहा इथंच आहे. तुझा काय तो सौभाग्य अलंकार पाहिजे– तर मी स्वतः चढवितों तुझ्या अंगावर; मग तर झालं?

**सईबाई** : हं खबरदार, कुंवारपणाला न शोभणारं असं भलतं सलतं कांहीं कराल तर – माझ्याशीं गांठ आहे!

**लाडोजी** : कबूल. पण या कुवारणीला कुंकू लावून सुवासीन केल्यावर मग काय हरकत आहे. तें कांहीं नाहीं – माझ्या हातांनीं मी तुला कुंकू लावणारच. [ करंडा उघडतो. त्यांतील पत्र पाहून संतापतो. ] हें असं आहे काय? 'सौभाग्यकांक्षिणी सईबाई निंबाळकर यांसी विनंती. प्रतिशिवाजी राजे उपरी विशेष. तुमचें पत्र पोंचलें. एकंदरींत तूं पाठविलेल्या पत्राचं उत्तर आहे हें. पुढं काय लिहितो— 'दुःखितांना मुक्त करण्याचं माझं ब्रीदच आहे. काळजीचं कारण नाहीं. मनांतली भावना समजली. मासाहेबांची संमति मिळाल्यास दुधांत साखर पडल्यासारखें होईल. आमच्या मासाहेब असल्या सद्गुणी सुनेचा अव्हेर करणार नाहींत याची खात्री बाळगावी. लोकापवादास भिऊन वागणूक ठेवीत आहांतच. सूज्ञास विशेष लिहिणें नलगे. देवी भवानी मनोरथ पूर्ण करण्यास समर्थ आहे.' एकूण असल्या गुप्त कारस्थानाचा कट चालला आहे काय? आणि तूं त्यांत सामील! पण तुला त्या कटांत सामील व्हायला जिवन्त ठेवीन तेव्हां ना? थांब, काम नाहीं म्हणून या म्यानांत घोरत पडलेली या इनामदार बच्चाची तरवार तुझा चांगला समाचार घ्यायला अगोदर बाहेर काढतो. [ तरवार काढून ] चल, घे देवाचं नांव.

**सईबाई** : धांवा हो धांवा! या काळाच्या हातून माझं रक्षण करा.

**बा. मोहिते** : [ पिराजी, मोहिते प्र. क. ] अरे, अरे, थांब. आहे तरी काय गडबड—?

**लाडोजी** : हें पहा, तुम्ही मुकाट्यानं बाजूला व्हा. या वेळीं हा इनामदार बच्चा बापाचा बाप जरी आला तरी ऐकणार नाहीं.

**बा. मोहिते** : अरे पण – काय झालं हें थोडं सांगशील कीं नाहीं?

**लाडोजी :** काय सांगायचं ? या तुमच्या भावी सुनेनं, माझ्या नाकाला चुना फांसून तुमच्या तोंडालासुद्धां काळं फांसण्याचा बेत केला आहे. म्हणून हिला या जगांत जिवंतच ठेवतां कामा नये !

**पिराजी :** अहो, असं काय करतां; थोडे शांत व्हाल कीं नाहीं ?

**लाडोजी :** हें पहा, बापाला बाप न म्हणणारा हा इनामदाराचा बच्चा, तुझ्यासारख्याचं ऐकणार होय ? तें कांहीं नाहीं, तरवार गाजविण्याची आलेली ही संधि हा इनामदार बच्चा केव्हांहि दवडणार नाहीं. व्हा पाहूं बाजूला. सात पिढ्यांना माझं शौर्य दिसलं पाहिजे.

**पिराजी :** अहो धनीसाहेब, यांना मारल्यावर, यांच्या वडिलांची जहागीर तुम्हाला कशी मिळणार ? लग्न तरी होऊं दे, मग त्यांचं वाटेल तें करायला मुखत्यारच आहांत कीं आपण.

**लाडोजी :** [ विचार करून ] मी तुमचं म्हणणं एकवार ऐकेन; पण एका अटीवर.

**पिराजी :** काय म्हणणं आहे आपलं ?

**लाडोजी :** ती जहागीर मिळाल्याबरोबर, मला मुखत्यारी देऊन, बाबांनीं हरी हरी म्हणत स्वस्थ बसलं पाहिजे !

**बा. मोहिते :** तूंच सांग रे — मी एवढं जिवाचं रान करतों आहें तें कुणासाठीं ? मुलगा करता–सवरता होऊन मुखत्यारीनं काम पाहूं लागला कीं मग, आम्हाला तरी काय करायची आहे ही पंचाईत ! आम्ही आपले गप्प बसूं–मग तर झालं ?

**लाडोजी :** काय ? मी अजून कर्ता–सवरता झालों नाहीं असं वाटतं तुम्हाला ? गांवांतील इतक्या भानगडी कानावर येऊनसुद्धां अजून तुमच्या डोळ्यांना मी कर्ता–सवरता दिसत नाहीं !

**बा. मोहिते :** अरे होय बाबा. त्या भानगडी ऐकून कान किटले. म्हणून तर या लग्नाच्या पाशांत तुला अडकविण्याची खटपट चालू आहे. आणि तूं तर लग्न होण्यापूर्वीच भावी नवरीचा गळा उतरायला तयार झाला आहेस !

**लाडोजी :** असल्या बायकांच्या भानगडी वडीलधाऱ्यांना न सांगतां–मुखत्यारीनं पार पाडाव्यात म्हणतों. पण बायकांच्या कामांतहि तुमच्याकडून मला मुखत्यारी नाहीं ! मग या इनामदार बच्चानं करावं तरी काय ?

**पिराजी** : अहो, लग्न झाल्यावर तुमच्या बायकोचं काय वाटेल तें करायला तुम्हीं मुखत्यारच आहांत.

**लाडोजी** : पण, ही लग्न होऊं देईल तेव्हां ना ? या लग्नांतलं हें विघ्न तरी पहा —
[ पत्र देतो

**बा. मोहिते** : [ पत्र वाचून ] काय, या शिवाजीला इतक्या ताकिदी दिल्या असतां, त्याच्या कारवाया आणि उपद्व्याप अजून बंद होत नाहींत ! बरं आहे म्हणावं बचाजी, माझ्याशीं गांठ आहे.

**लाडोजी** : आणि या इनामदार बचाची गांठ आतां हिच्याशीं आहे.

**बा. मोहिते** : बस्स. हिला या ठिकाणीं आतां क्षणभरसुद्धां ठेवायची नाहीं. आतांच्या आतां हिला हलवली पाहिजे. पिराजी, जा रे, भोई नि मेणा घेऊन ये. [ पिराजी जातो ] बाळ, मेणा आतां येईल. त्यांतून हिला ठरल्या ठिकाणीं घेऊन जा. मी दादाजीचं घरदार, वतनवाडी सारं जप्त करून, व्यवस्था लावून येतों हं.
[ जातो

**लाडोजी** : एँ ! आतां कुठं जाशील, आणि कसल्या कारवाया करशील तें पाहतों.

कुठवर गमजा पोरी, पकडली तुमची चोरी ॥
अक्कल माझी न्यारी, वाहवा, वाहवा, वाहवा
बहूत खाशी भले शाबास, भले शाबास ॥ वाहवा, वाहवा ॥ध्रु०॥
पकडुनि कारागारीं, तुजला ठेविन नारी
समयीं या कैवारी
एकचि आमुची स्वारी ॥ बहुत खाशी० ॥ १ ॥

[ ४ ]

— **स्थळ** : दादाजी प्रभूच्या वाड्याची देवडी —

**कलगी** : [ प्र. क. ] कां? अशा हिरमुसल्या तोंडानं खालीं मान घालून बसायला काय झालं?

**तुराजी** : तें राहूं दे. कलगी, तूं गेली होतीस त्या कामाचं काय झालं?

**कलगी** : इकडली बातमी शिवाजीराजांना सांगावयला गेलें खरी, पण त्यांची भेट न झाल्यामुळं, तशीच परत आलें. मात्र तिथं मला एक आनंदाची बातमी समजली. ती अशी कीं, शिवाजीराजे जातीनं दादाजींची सुटका करायला गेले आहेत. आतां ही बातमी ताईसाहेबांना केव्हां सांगेनसं झालं आहे.

[ वाड्यांत जाऊं लागते

**तुराजी** : कलगी, कुठं चाललीस? तिथं तुला कोणीही भेटणार नाहीं.

**कलगी** : म्हणजे! मला ताईसाहेब नाहीं का भेटणार? असं मोघम काय बोलतां?

**तुराजी** : त्या हरामखोरांनीं तुझ्या ताईसाहेबांना इथून केव्हांच काढून नेलं आहे. आतां कड्याकुलपाशिवाय तुला कांहीं एक तिथं दिसणार नाहीं.

**कलगी** : काय? शेवटीं त्या कसाबांनीं आमच्या गरीब गायीला ओढून नेली म्हणतां? परमेश्वरा, या जगांत गरीबाचा वाली कोणीच नाहीं का?

**तुराजी** : कलगी, व्हावयाच्या त्या गोष्टी होऊन गेल्या! आतां आपण असं कपाळाला हात लावून बसण्यापेक्षां, आपल्या हातून होईल तेवढी खटपट करूं या आणि मग देवावर हवाला ठेवूं या.

**कलगी** : खरं आहे तुमचं म्हणणं. ही पहा मी ताईसाहेबांना सोडवून आणायला तयार झालें. काय वाटेल तें करून, त्यांना सोडवून आणीनच आणीन. मात्र या कामांत मला तुमची मदत झाली पाहिजे.

**तुराजी** : हा पहा, मी एका पायावर तयार आहें. प्राण गेला तरी पर्वा नाहीं. ताईसाहेबांना आपण सोडवून आणूच आणूं.

**कलगी** : हें पहा, तो पिराजी लग्नासाठीं माझ्या मागं लागला आहे. ताईसाहेबांना तोरणा किल्ल्यावर घेऊन जाणार अशी बातमी त्याच्याकडून समजली होती. त्या वेळीं त्याच्या स्वभावाप्रमाणं कांहीं तरी थापा मारतो आहे असं वाटलं, पण त्यानं सांगितल्याप्रमाणं खरंच झालं!

**तुराजी :** आलं ! आलं–एकंदरींत तुझं धोरण लक्षांत आलं ! त्या पिराजी दगडाला चार थापा मारून, त्याच्या तोंडून ताईसाहेबांचा सुगावा लावणार, हेंच ना ? एकंदरींत बायका जातीच्याच चतुर म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं.

[ दादोजी, दादाजी, शिवाजी प्र. क.; दादाजीस पाहून

**तुराजी :** शेवटीं आमच्या राजांनीं आपल्याला काळाच्या दाढेंतून सोडवून आणलं म्हणायचं ?

**कलगी :** देवा, आमच्या या राजाला उदंड आयुष्य दे.

**दादाजी :** कलगी, आम्ही आलों आहोंत म्हणून ताईला वर्दी दे पाहूं.

**शिवाजी :** दादा, तुझ्याच घरांत जायला वर्दी द्यायची वेळ आली का तुला ?

**तुराजी :** होय राजेसाहेब ! स्वतःच्या घराला पारखे होण्याची वेळ आली आहे. मोहितेसाहेबांच्या हुकमाशिवाय आतां या वाड्यांत कुणालाहि जातां यायचं नाहीं.

**कलगी :** आणि आतां वाड्यांत जाऊन करायचंय् काय ? देव नाहीं त्या देवळांत जायचं तरी कशाला ?

**दादाजी :** म्हणजे ? तूं हें म्हणतेस तरी काय ?

**तुराजी :** ती काय म्हणणार ? तिच्या देवघरांतील देवी ते हरामखोर घेऊन कुठं गेले आहेत आणि त्यांनीं वाड्याला कुलपं ठोकलीं आहेत.

**दादाजी :** काय, माझ्या ताईला शेवटीं ते दुष्ट घेऊन गेले ?

**शिवाजी :** दादा, असं वाईट वाटूं देऊं नकोस. कुठं घेऊन जातील ? सप्त पाताळांत नेऊन ठेवलं तरी, तेथून आणल्याशिवाय राहणार नाहीं मी, हें पक्कं लक्षांत ठेव.

**दादाजी कोंड० :** राजे, थोडे थांबा पाहूं; काय आहे तें मी पाहतों. तुराजी, मोहित्यांना किती वेळ झाला जाऊन, आणि ते कोणत्या दिशेनें गेले, माहीत आहे का ?

**तुराजी :** आहे माहीत....

**दादाजी कोंड० :** मग असाच मोहितेसाहेबाकडं जा आणि आम्ही आल्याची वरदी देऊन, त्यांना बोलावून घेऊन ये पाहूं ?

**शिवाजी :** आणि जर कां निरोपासरशीं येण्यास निघाले नाहींत तर त्यांना कुलपं तोडून मोहरा फोडल्या जातील असं सांग. [ तुराजी जातो

**दादाजी :** कलगी, ताईला नेत असतां तूं कुठं होतीस ?

**कलगी :** ताईसाहेबांना ते दुष्ट कुठं तरी घेऊन जाणार, अशी मला थोडी कुणकुण लागतांच, ती बातमी राजांना पोहोंचावायला रायगडास गेलें. पण राजे आपणांला सोडवून आणायला गेल्याचं समजतांच, त्याच पावलीं परत फिरले. येऊन पाहतें तों, त्या गरीब गाईला कसाबांनीं नेल्याचं समजलं.

**दादाजी :** आपलीं माणसंच अशी कसाबकरणी करूं लागली तर काय बोलायचं ?

**शिवाजी :** दादा, परक्या शत्रूपेक्षां, हे घरभेदेच जास्त घातक असतात. म्हणून हे कृष्णसर्प, अगोदर ओढून काढून जागच्या जागीं ठेंचले पाहिजेत.

**दादाजी कोंड० :** राजे, असे उतावीळ होऊं नका. कोणतीहि गोष्ट अगोदर सामोपचारानं मिटविण्याचा प्रयत्न करावा. त्यांनीं नाहीं भागलं तर मग पुढील मार्गाला लागावं.

**शिवाजी :** गुरुदेव, आपल्या शिकवणीप्रमाणेंच या वाड्याच्या मोहरा, कुलूप न तोडतां मामासाहेबांची वाट पाहात आहे.

**बा. मोहिते :** [प्र. क.] आणि आलों नसतों तर...

**शिवाजी :** मोहरा फोडून कुलूप काढण्याचे श्रम घ्यावे लागले असते. मामासाहेब, बऱ्या बोलानं ज्यांचं घर त्यांना मोकळं करून द्या, नाहीं तर...

**बा. मोहिते :** नाहीं तर काय कराल...?

**शिवाजी :** मनगटाच्या जोरावर ताबा घेतला जाईल.

**बा. मोहिते :** बादशहाचा प्रचंड सेनासागर, हातांत नंग्या समशेरी परजून या मोहरांपाठीमागें तयार आहे, हें लक्षांत घेऊन जें काय बोलायचं तें बोला.

**शिवाजी :** दुसऱ्याचं वित्त हरण करणारी ती अन्यायी सत्ता, ठोकरीनं उडवून देण्यासाठींच या शिवाजीनं जन्म घेतला आहे, हें जाणून तुम्हींच काय बोलायचं तें तोंड सांभाळून बोला.

**दादाजी कोंड० :** राजे, तुम्ही थोडे बाजूला व्हा पाहूं. काय हो मामासाहेब, दादाजीनं असा काय अपराध केला होता म्हणून त्याची वतनवाडी जप्त केली... नि बेसावध स्थितींत दादाजीवर छापा घालून त्याला पकडण्याचा विश्वासघात काय म्हणून केला ?

**बा. मोहिते :** काय ? मीं तिश्वासघात केला ? एकूण मला विश्वासघातकी समजतां ? बरोबर आहे ! मनुष्याला स्वतःसारखं जग दिसत असतं. पण हें लक्षांत ठेवा, कीं तुमच्यासारखा विश्वासघात करून मी निमकहराम मात्र बनलों नाहीं.

**शिवाजी :** काय ? [अंगावर जाऊन] मामासाहेब, पुन्हा जीभ उचला पाहूं.
[ दादाजी कोंड० त्यांस मागें ओढतो

**बा. मोहिते :** काय, खोटं बोललों मी ! शहाजीराजानं विश्वासू समजून आपला मुलगा व जहागीर यांच्या स्वाधीन केली. पण या गुरुदेवांनीं मुलाला बंडखोरी शिकवून वडिलांच्या गळ्याला फांस मात्र लावला. या करणीला विश्वासघात नाहीं म्हणायचं, तर काय स्वामिभक्ति म्हणायची ?

**दादाजी कोंड० :** काय म्हटलंत पंत, शहाजीराजांच्या गळ्याला मीं फांस लावला ?

**बा. मोहिते :** आणखिन् कांहीं शंका आहे वाटतं ? इकडील तुमच्या पुंडाव्याची बातमी बादशहाच्या कानापर्यंत गेली, आणि तुमचेकरवीं शहाजीराजेच पुंडावे करतात अशी त्यांची समजूत झाली. आणि त्यामुळेंच राजांवर इतराजी होऊन त्यांची कैदखान्यांत रवानगीसुद्धां झाली.

**दादाजी कोंड० :** काय – शहाजीराजे कैद झाले ? आणि त्याला मीच कारण ?

**बा. मोहिते :** होय, होय. तुमचेच प्रताप त्यांना भोंवले. [ खालीं मान घालून उभे राहिलेले पाहून ] कां ? मोहरा फोडून कुलूप; तोडणाऱ्याच्याच तोंडाला कुलूप कां पडलं ? हिंदवी स्वराज्य म्हणे, – हिंदवी स्वराज्य ! स्वराज्य स्थापन करणारांचीं तोंडं पहा !!
[ निघून जातो

**शिवाजी :** गुरुदेव ! चला, याच पावलीं चला. काय वाटेल तें करून, वेळीं आपले प्राण खर्ची घालून, अगोदर पिताजींची सुटका केली पाहिजे.

**दादाजी कोंड० :** बाळराजे, तुमच्या पराक्रमाबद्दल शंका नाहीं. पण जें काम शक्तीनं होणार नाहीं तें काम युक्तीनंच पार पाडलं पाहिजे. बादशाही सामर्थ्याला टक्कर देण्याजोगी शक्ति येण्यास थोडा अवकाश आहे. तोंपर्यंत युक्तीनंच कार्य साधलं पाहिजे.

**शिवाजी :** गुरुदेव, बोला – कोणत्या युक्तीनं माझ्या पिताजींची सुटका होईल ? बोला, काय करूं मी या वेळीं ? वाटेल तें करा, पण माझ्या पिताजींची आधीं सुटका करा.

**दादाजी कोंड० :** बाळराजे, तुम्ही स्वस्थ असा. राजेसाहेबांच्या बंदिवासाला मीच कारण आहे, अशी बादशहाची झालेली समजूत मींच दूर केली पाहिजे;

त्याची सर्व जबाबदारी माझेवर आहे. चला. सर्व कामें बाजूला ठेवून अगोदर राजेसाहेबांच्या सुटकेच्या विचाराला लागू. [ सर्व जातात

**कलगी :** दैवगति विचित्र म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. ताईसाहेबांसंबंधीं मला मिळालेली बातमी राजांच्या कानावर घालून त्यांच्या सुटकेचा प्रयत्न करावा म्हटलं, पण वेळ कशी आली पहा !

**तुराजी :** पण असं वाईट वाटायचं कारण काय ? आपल्या शिरावर ही कामगिरी पार पाडण्याची आपणहून आलेली ही सोन्याची संधि साधूं या.

**कलगी :** खरं आहे तुमचं म्हणणं. आतां, अगोदर ताईसाहेबांना नक्की कुठं ठेवलं आहे, याचा वेषांतर करून तपास करूं. तो पिराजी एक दोन दिवसांत कांहीं तरी निमित्त काढून आल्याशिवाय राहणार नाहीं. तेव्हां तो येईपर्यंत या वाड्यांतून हलायचं नाहीं.

**तुराजी :** कांहीं हरकत नाहीं. माझी शक्ति नि तुझी युक्ति ज्या कामास लावूं तें काम हातखंडा झालंच म्हणून समज. [ जातात.

[ ५ ]

— **स्थळ :** रोहिडेश्वराच्या देवळाचा गाभारा —

**दादाजी :** [ महादेवासमोर गुडघे टेकून बसलेल्या दादाजी कोंडदेवास ] गुरुदेव, शहाजीराजांच्या सुटकेचा मार्ग दाखवून सर्वांना आज आनंदित करतों असं सांगून मला इकडं घेऊन आला; पण कांहींच न बोलतां असे संचित कां बसलांत ?

**दादाजी कोंड० :** राजेसाहेबांच्या सुटकेचा एकच मार्ग आहे, आणि तो आक्रमायला प्रभूजवळ धैर्याची करुणा भाकत आहे.

**दादाजी :** गुरुदेव, कसल्याहि कठीण प्रसंगाला न डगमगणारीं आमचीं मनं कमकुवत आहेत अशी का शंका आली आपल्याला ? आपली आज्ञा व्हायचाच अवकाश, राजेसाहेबांच्या सुटकेसाठीं वेळीं आम्ही देहार्पण करायला तयार आहों कीं नाहीं याची एक वेळ प्रचीति तर पहा.

**दादाजी कोंड० :** देहार्पण ! राजेसाहेबांच्या सुटकेकरितां देहार्पण !! बरोबर बोललास. राजेसाहेबांच्या सुटकेसाठीं देहार्पणाशिवाय मार्गच नाहीं. बादशहाच्या

मनांतील संशय दूर होऊन राजेसाहेबांची सुटका व्हावयाला, एकच मार्ग शिल्लक आहे. आणि तो मार्ग म्हणजे — देहार्पण !

**दादाजी** : मग हें सत्भाग्य माझ्या वांट्याला घालून, हिंदवी स्वराज्य–स्थापनेला हातभार लावण्याची, ही सोन्याची संधी मला नाहीं का देणार ?

**दादाजी कोंड०** : दादा, देशाच्या कल्याणासाठीं व्यक्तीनं स्वतःचा बळी देणं हासुद्धां अेक मोठा स्वार्थच आहे. त्याचा लोभ तुम्ही आम्ही सर्वांनीं धरावयाला पाहिजे बरं. तें जाऊं दे. तूं असाच मासाहेबांकडे जाऊन, बाळराजांना घेऊन यायला सांग. ते इथं येतांच शहाजीराजांच्या सुटकेचा मार्ग त्यांचे हातीं पडेल. जा, लौकर त्यांना घेऊन ये.

**दादाजी** : गुरुदेव, आमच्यासारखीं माणसं हातांत शिरकमल घेऊन उभीं असतां, इकडं यायची तसदी त्यांना काय म्हणून ?

**दादाजी कोंड०** : दादा, असा भलताच अर्थ घेऊं नकोस. शहाजीराजांच्या अटकेमुळें स्वराज्य–स्थापनेचं कार्य, बालराजे नाउमेद होऊन, अर्धमुर्धच टाकतील कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. तेव्हां त्यांनाच राजेसाहेबांच्या सुटकेचा बिनचूक मार्ग पटवून देऊन, कर्तव्यदक्ष करणं अवश्य आहे.

**दादाजी** : मग ती कामगिरी मला सांगून मला तें यश नाहीं कां लाभूं देणार ?

**दादाजी कोंड०** : दादा, हें तूं बोलत नसून तुझ्या मुखानं आजचा आख्खा महाराष्ट्र बोलत आहे. हिंदवी स्वराज्यासाठीं हातावर शिरकमल घेऊन निघालेले तुझ्यासारखे हजारो तरुण या मायभूमींत असतां, काळजीचं कारण काय ? जा. शंका–कुशंकांत वेळ न घालवतां बालराजांना बोलावून आण. हिंदवी स्वराज्य लौकर मिळविण्याचा मार्ग त्यांच्या हातीं देणार आहे. [ नमस्कार करून दादाजी प्रभु जातो.] मीं पतकरलेल्या मार्गांत आत्महत्येचं महत्पाप मला लागेल का ? छेः ! ही आत्म-हत्त्या नव्हेच, स्वामिनिष्ठेचं पुण्य आहे ! माझ्या करवीं शहाजीराजानं फंदाफितुरी चालविली आहे, असा बादशहाला आलेला संशय माझ्या आत्महत्त्येनं दूर होईल, आणि शहाजीराजांची सुटका होईल. शिवाजी आपलं ऐकत नाहीं म्हणून, दादाजीनं निराश होऊन विषप्राशन करून प्राण दिला, ही बातमी बादशहाच्या कानावर जाणं, हाच सध्यां राजांच्या सुटकेचा एकमेव मार्ग आहे. शिवस्वरूपानं हिंदवी स्वराज्य स्थापणाऱ्या भो कैलासनाथा, मला आपल्या स्वरूपांत मिळवून घेऊन आजपर्यंत केलेल्या तपश्चर्येचं सार्थक कर.

[ विषाची पूड तोंडांत टाकून महादेवाच्या पींडीला मिठी मारतो

**शिवाजी** : [ प्र. क. ] गुरुदेव, काय होतंय् आपल्याला आणि आपण असं काय करतां आहांत ?

**दादाजी कोंड०** : बाळाराजे, मला तहान लागली आहे.

**शिवाजी** : दादा, जा लौकर, थोडं पाणी घेऊन ये. [ दादाजी निघतो, इतक्यांत

**दादाजी कोंड०** : बाळ शिवबा, मला पाण्याची तहान लागली नाहीं. मला गो – ब्राह्मणप्रतिपालक हिंदवी स्वराज्याची तहान लागली आहे.

**शिवाजी** : मग ती तहान मी भागविणार नाहीं अशी का शंका आहे आपल्याला ?

**जिजाई** : हें चिन्ह कांहीं नीट दिसत नाहीं. बाळ, थोडा बाजूला हो पाहूं. दिवाणजी, असं काय करतां आहांत ? काय होतंय् आपल्याला ?

**दादाजी कोंड०** : मला काय होत आहे! व मी काय करीत आहे! !– हें माझं पत्र तुम्हाला सांगेल. [ जिजाई पत्र घेऊन दादाजी प्रभूकडे देते ] शंभो ! शंभो !!

**दादाजी** : [ पत्र वाचतो ] ' चिरंजीव राजेश्री शिवाजी राजे यांसी — अनेक आशिर्वाद, उपरी. तुमच्या वडिलांस कैद झाल्यापासून तुमचे जिवास चैन नाहीं; अंगिकारलेल्या कार्यात हुरूप नाहीं. हा एकंदर प्रकार जाणोन, तुमचे वडिलांचे सुटकेकरितां, एकच मार्ग होता तो मीं पत्करलेला आहे. खालीं कलमी केलेली बातमी, बादशहाच्या कानापर्यंत जाण्यांत बिलकूल कसूर होऊं देऊं नये. त्या बातमीनं बादशहाचं मन साफ होऊन खात्रीनं तुमच्या वडिलांची सुटका होईल. आणि गो – ब्राह्मणप्रतिपालक हिंदवी स्वराज्य स्थापन करण्याचा मार्ग खुला होऊन, त्यांत तुम्हाला खात्रीनं यश येईल.'

**शिवाजी** : दादा, पुढं वाच. गुरुदेवांनीं कोणती बातमी बादशहाच्या कानापर्यंत पोंचवायला सांगितली ती !

**दादाजी** : ' शिवाजी आपलं ऐकत नाहीं म्हणून, दादाजीनं निराश होऊन विषप्राशन करून प्राण दिला.'

**जिजाबाई** : अग बाई, प्राण दिला ! दिवाणजी काय केलंत हें ? धन्य – धन्य आहे तुमच्या स्वामिनिष्ठेची. हिंदवी स्वराज्यासाठीं देहार्पण करण्याचा प्रत्यक्ष कृतीनं धडा घालून दिलांत, सीमा झाली तुमच्या देशभक्तीची.

**शिवाजी** : [ तरवार टाकून ] माताजी, मला नको तें हिंदवी स्वराज्य आणि तें सिंहासन. गुरुदेवासारखे महात्मे बळी देऊन जें सिंहासन उभारायचं

त्याच सिंहासनावर बसून ' गो–ब्राह्मण–प्रतिपालक ' असा खोटाच टेंभा मिरवायचा ना ? मला नको तें सिंहासन !

**जिजाबाई** : बाळ शिवबा, तुला आतां असं म्हणून कसं चालेल ? आपल्या गणगोतावर बाण सोडायला कचरणाऱ्या अर्जुनाला भगवंतांनीं सांगितलेल्या गीतेंचं मनन कर. देवांच्या रक्षणासाठीं आपलीं हाडं देणाऱ्या दधीचि ऋषींची आठवण कर. म्हणजे असल्या भलत्यासलत्या कल्पना तुझ्या मनाला शिवणार सुद्धां नाहींत.

**शिवाजी** : माताजी, तुमचं म्हणणं जरी खरं असलं तरी तें पटण्याइतकी या वेळीं माझ्या मनाची स्थिरता नाहीं. पोटच्या मुलाप्रमाणं संगोपन करणाऱ्या या गुरुदेवांच्या वियोग – दुःखानं माझं मन भांबावून गेलं आहे.

**जिजाबाई** : बाळ, थोडा शांत हो आणि विचार कर. हिंदवी स्वराज्य स्थापन करण्यासाठीं देहार्पण करणाऱ्या या तुझ्या गुरुदेवांच्या आत्म्याला शांति मिळायला नको का ? स्वारींच्या कैदेमुळं बेचैन झालेल्या तुझ्या मनाला कर्तव्यदक्ष करण्यासाठीं ज्या गुरुदेवांनीं आत्मार्पण करून, स्वारींच्या सुटकेचा प्रश्न सोडविला, त्यांच्या आत्म्याला तूं शांति द्यायला नकोस का ?

**शिवाजी** : माताजी, कशी शांति देऊं ? आणि मी काय करूं ? मला कांहीं सुचेनासं झालं आहे !! [ रडूं लागतो

**जिजाबाई** : अशा थोर विभूतींच्या आत्म्याला आसवांच्या तिलांजलीनं शांति मिळत नसते. ज्यासाठीं या तुझ्या गुरुदेवांनीं प्राणावर उदक सोडलं, ती त्यांची इच्छा तृप्त करायला तरवारीच्या पाण्याची जरूरी आहे. त्याशिवाय त्यांच्या आत्म्याला शांतिच मिळणार नाहीं.

**शिवाजी** : खरं आहे आपलं म्हणणं, माताजी. प्रत्यक्ष गुरुदेवच आपल्या मुखानं बोलताहेतसं मला वाटतं. माझ्या तरवारीच्या पाण्याच्या तिलांजलीशिवाय माझ्या गुरुदेवाचा आत्मा शांत होणारच नाहीं.

**जिजाबाई** : हें खरं ना ? मग घे ती तरवार आणि देवाब्राम्हणासमक्ष हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेची प्रतिज्ञा कर; आणि नंतर या जडदेहाची व्यवस्था कर.

**शिवाजी** : हा पहा तयार झालों. [ तरवार घेऊन ] देवाब्राम्हणांसमक्ष आणि माझ्या गुरुमाऊलीसमक्ष हा शिवाजी प्रतिज्ञा करतों कीं, हिंदवी स्वराज्यासाठीं,

या गुरुदेवाप्रमाणं प्राणाची पर्वा न करितां आजन्म प्रयत्नांची परमावधी करीन, सर्वस्वाचा होम करीन —पण मायभूमीशीं कधींहि बेमान होणार नाहीं.

[ पिंडीवर व दादाजीवर फुलें वाहतो

**दादाजी** : हा दादाजी प्रभू, देवाब्राम्हणासमक्ष शपथ घेतो कीं, हिंदवी स्वराज्यासाठीं या गुरुदेवाप्रमाणं प्राणाचीहि पर्वा न करितां इमानें इतबारें शिवाजीराजांच्या आज्ञेचं पालन करीन. [ फुलें वाहतो

मायभूमि, आज तुझी आण वाहतो ॥ तुझी ॥
चंद्र आणि सूर्य, तया, साक्ष पाहतो ॥ तया ॥
ध्येय राष्ट्रकार्य सदा, गणित तुल्य ईशपदा,
त्यांत पात वा विपदा, सर्व सोशितो ॥ तुझी० ॥ १ ॥

[ मावळ्यांना शिवाजी तरवारी वाटतो. मावळे तरवारी घेऊन शपथ घेतात. बेलपत्री पिंडीवर वाहतात. असा क्रम फुलांमध्यें दादाजी कोंडदेवाचा देह झांकेपर्यंत चालतो.

# ३

[ १ ]

— **स्थळ** : दादाजी प्रभूचा वाडा —

**बा. मोहिते** : [ खालीं मान घालून उभ्या असलेल्या तुराजीस ] तुला हज्जार वेळां सांगितलं तरी तूं ऐकत नाहींस. इथं आतां तुझं कांहीं काम नाहीं. चल, अगोदर वाड्याबाहेर नीघ पाहूं.

**तुराजी** : सेवाचाकरी करून पिढ्यान् पिढ्या या वाड्यांत गुजरण करीत आलों. आतां कुठं जा म्हणतां आम्हाला ? कुठं जावं आम्हीं ?

**बा. मोहिते** : मला काय विचारतोस ? वाटेल तिकडं जा. त्या शिवाजीच्या फंदफितुरींत सामील होण्याचे वेळीं मला विचारायला आला होतास वाटतं ? हं, उचल बघूं तुझं बाड बिछाड. हें पहा, आतां मुकाट्यानं बाहेर हो नाहीं तर धक्के मारून बाहेर घालविलं जाईल. [ कलगी येते ] तूंहि पुन्हां आलीस का ? वाड्याची पायरी चढूं नको म्हणून तुला सतरा वेळ बजावलं, तरी तुझा लोचटपणा कांहीं सुटत नाहीं.

**कलगी** : साहेब, असं गरिबाला बाहेर कां ढकलतां ? आमचा सारा जन्म इथं गेला—आमची चीजवस्त काय तें सारं या वाड्यांतच आहे. तेवढं तरी आमचं आम्हाला द्या. म्हणजे जाऊं आम्ही कुठं तरी.

**बा. मोहिते :** तें कांहीं नाहीं – कांहीं एक मिळणार नाहीं. वाड्यांतील सारी मालमत्ता जप्त केली आहे. चला कसे अगोदर वाड्याबाहेर.

**कलगी :** साहेब, एका वस्त्रानिशीं आम्हीं कुठं जावं ? काय करावं बरं आम्हीं ?

**बा. मोहिते :** पुन्हां तेंच ! म्हणे कुठं जाऊं ? वाटेल तिकडे जा, नाहीं तर मुरळी हो. मला काय विचारतेस ?

**तुराजी :** चल, आतां आम्हांला देवाचाच आधार. यांच्या म्हणण्याप्रमाणं वाघ्या – मुरळी होऊन देवाची सेवा करूं. कसाबाला थोडीच दया येणार !

**बा. मोहिते :** कुणाला कसाब म्हणतोस ? चल कसा येथून.

[ धक्के मारून घालवतो

**कलगी :** बाबा, खंडोबाराया, घे रे बघून ! [ हात मारून माती उधळते.

**तुराजी :** घे येळकोट, येळकोट घे !!

**बा. मोहिते :** मी कसाब नाहीं का ! संभाळा म्हणावं बेट्यांनों, तुमचीं पाळंमुळं खणून काढल्याशिवाय राहणार नाहीं.

**पिराजी :** [ प्र. क. ] काय झालं धनीसाहेब ? असे संतापलां कां ? काय झालं ? आणि कुणाचीं पाळंमुळं खणून काढणार ?

**बा. मोहिते :** त्या दादाजीनं शेफारून ठेवलेलीं माणसं आहेत ना ? तीं थोडींच चैन पडूं देतात आम्हाला.

**पिराजी :** धनीसाहेब, तें जाऊं दे. तोरणा किल्ल्याच्या पत्त्यावर विजापुराहून दोन लखोटे घेऊन सांडणीस्वार आला होता. ते लखोटे धाकट्या धनीसाहेबांनीं आपल्याकडं पोंचवायला सांगितलंय्. [ लखोटे देतो

**बा. मोहिते :** [ पत्र वाचून ] अरे, ऐकलंस कां ? वजीरसाहेबांची थैली आहे. त्यांत ते लिहितात — 'बादशहाचे कानावर अशी बातमी आली कीं, शिवाजी ऐकत नाहीं म्हणून, दादोजी कोंडदेव यानं निराश होऊन विष खाऊन प्राण दिला. यावरून शिवाजीच्या पुंडाव्यांत दादोजीचं अंग नाहीं, अर्थात् शहाजीचं तर नाहींच नाहीं, अशी खात्री होऊन खाविंदांनीं तुमचे मेहुणे शहाजीराजे यांची सुटका केली आहे.'

**पिराजी :** छान झालं, धनीसाहेब. हें सारं आपल्या खटपटीचं फळ बरं ! आपल्याकडून वेळेवर दादोजीची कानउघाडणी झाली नसती तर हें काम झालं नसतं. खरं म्हणतों ना मी ?

**बा. मोहिते** : अरे पण या पोरट्याच्या पायांत, बिचाऱ्या दादोजीला फुकट बळी जावं लागलं! हें गुणी बाळ आणखी कुणाकुणाचा काळ होणार आहे कुणाला ठाऊक. हें दुसरं पत्र कुणाचं बरं? [पाहून] हेंही त्यांचंच पत्र दिसतंय्. काय बरं लिहितात! [वाचतो] 'इज्जत असरी बाजी मोहिते सुभेदार परगणा सुपे, यांसी सुरसन समस अर्बेन अल्लफ, दरबारी शहाजाद्यांची शादी आहे. तेव्हां चांगल्या पुष्ट गाई व नजराणा ताबडतोब पाठवून देणें.' आतां काय करावं!

[विचार करतो.

**पिराजी** : काय झालं धनीसाहेब, विचार कसला करतां?

**बा. मोहिते** : अरे या परप्रांतांत केवळ बंदोबस्तासाठीं इथं सडा आलों आहे. तेव्हां हुकमाची तामिली ताबडतोब कशी करावी? आणि जर कां उशीर होऊन कसूर झाली, तर पटकन इतराजी व्हायची. हें पत्र वाचून तर माझ्या अंगाला दरदरून घामच सुटला.

**पिराजी** : धनीसाहेब, असं काय करतां? आणि येव्हढं घाबरायचं कारण तरी काय? अहो, दादाजी प्रभूच्या जप्त केलेल्या गाई तुमच्याच ताब्यांत आहेत ना? मला वाटतं, शंभराचेवर भरतील. त्याच द्या पाठवून. आणि जप्त केलेले दागिने विकून नजराण्याची भरती करा म्हणजे झालं. विचार कसला करतां? अहो, ती सर्व जिंदगी बादशहाच्या वतनांतून केली आहे ना? तूर्त तरी काम करून घ्या, आला झोला तर पुढच्या पुढं पाहतां येईल.

**बा. मोहिते** : तुझ्या म्हणण्याप्रमाणं गाईंची तेवढी अडचण भागेल. पण नजराण्याची अडचण भागणार नाहीं. बेट्यानं सुतळीचा तोडाहि शिल्लक ठेवलेला दिसत नाहीं. मला वाटतं, त्या शिवाजीच्या नादानं सारी जिनगानी मावळ्यांना चारून रिकामा झाला असावा. नाहीं म्हणायला सोन्याचांदीचे देव आणि देव्हारा कसा राहिला देव जाणें!

**पिराजी** : धनीसाहेब, मग आपलं कामच झालं. ते देव आणि देव्हारा गाळून नजराण्याची भरती नाहीं का होणार? असं दचकायला काय झालं? बादशहा म्हणजे प्रत्यक्ष देवच नव्हे का? तेव्हां त्यांत पाप लागणार नाहीं.

**बा. मोहिते** : बरं तर, आतांच्या आतां थट्टी कामगारास हुकूम दे कीं, ताबडतोब सर्व गाई विजापुराकडं रवाना करा म्हणून; अगदीं उशीर नको. [पिराजी जातो



लाडोजी:—लौकर आटप, आणि एकदांचे माझे डोळे उघड ! [अंक ३ : १



**सईबाई** :–जयाचा भाव आहे जैसा । तयासी लाभ होई तैसा [अंक २ : ३

**पिराजी** : [ पुन्हां प्रवेश करून ] मासाहेब आपल्या भेटीला येत आहेत, म्हणून वर्दी आली आहे.

**बा. मोहिते** : आपणहून कुणाकडं न जाणारी ही मानी बाई माझ्याकडं कशाला बरं येत असावी ?

**पिराजी** : दुसऱ्या कशासाठीं ? त्या पोरीसाठीं धडपड सुरू आहे, दुसरं काय ? त्या पोरानंहि त्या पोरीबद्दल बराच हट्ट धरला आहे म्हणे. आणि त्यांना वाटतं ताईसाहेब इथंच आहेत.

**बा. मोहिते** : बरं, येऊं दे त्यांना. काय उत्तर द्यायचं तें देईन. पण तूं जा कसा अगोदर ताबडतोब आणि गाई रवाना करण्याची व्यवस्था कर पाहूं.

[ पिराजी जातो. जिजाई, शिवाजी, दादाजी प्रभू येतात

**बा. मोहिते** : अरे, तुला पकडून नेलं असतां तूं पुन्हां इथं कसा ?

**शिवाजी** : अन्यायी जुलमी सत्तेच्या हातून आमच्या हातांतील न्यायदेवतेनं त्यांना सोडवून आणलं आहे, आणि आतां ही न्यायदेवता आपल्याला जाब विचारायला आली आहे. बऱ्या बोलानं बोला, या दादाजीची वतनवाडी खालीं करून देतां कीं नाहीं ?

**बा. मोहिते** : बेताल झालेल्या पोराबरोबर हुज्जत घालण्याची माझी इच्छा नाहीं. [ जिजाईकडे वळून ] हें पहा मासाहेब, आपणांस निक्षून सांगतों कीं, असल्या राजद्रोही माणसाकरितां आपण मध्यस्ती करूं नये. असल्या माणसाची तरफदारी करीत आहांत ही बातमी बादशहाच्या कानापर्यन्त गेली तर नुकतीच सुटका झालेल्या शहाजीराजांना पुन्हां बंदिशाळा दाखवायला तुम्हीच कारण व्हाल. म्हणून म्हणतों, येव्हढी तरी पुण्याई पदरांत बांधून घ्या.

**जिजाई** : काय – स्वारींची सुटका झाली ? एकंदरींत गुरुदेवांची पुण्याई फळाला आली म्हणायची. दाजी, केवढी आनंदाची बातमी सांगितलीत ही. पण काय हो, दाजी, राजांची सुटका व्हायला कारण तरी काय झालं असावं असं तुम्हाला वाटतं ?

**बा. मोहिते** : कारण कसलं विचारतां ? आमच्या इकडील बंदोबस्ताच्या कामगिऱ्या बादशहाच्या कानापर्यंत जातच होत्या. त्यांत शिवाजी आपलं ऐकत नाहीं म्हणून दादोजीनं निराश होऊन प्राण दिला ही बातमी बादशहाला समजली. त्या

योगानें शिवाजीच्या पुंडाईत शहाजीराजांचं अंग नाहीं अशी खात्री होऊन खाविंदांनीं त्यांची सुटका केली.

**जिजाई** : बरं दाजी, आम्ही येथें कां आलों हें तुम्हाला कळलं का ? या दादाचं काय म्हणणं आहे तें थोडं ऐकून घ्या, आणि त्याचा काय अपराध असल्यास सांगा. आपापसांत उगीच दुही माजवून रक्त सांडूं नये, म्हणून मी होऊन दोन समजुतीच्या गोष्टी सांगण्यासाठीं आलें आहे.

**बा. मोहिते** : मासाहेब, माझ्या हातीं काय आहे ? जें व्हायचें तें होऊन बादशाही हुकमानं वज्रलेप झालं आहे. आतां पुन्हां वतनवाडी मिळण्याची खटपट करणं म्हणजे मगरानं गिळलेलं माणिक त्याच्या जबड्यांतून बाहेर काढण्याचा प्रयत्न करण्यासारखं आहे.

**दादाजी** : हें पहा मामासाहेब, तुमच्या मनांतून माझी वतनवाडी मला द्यायची इच्छा नसेल तर मला देऊं नका. तुम्हाला जरी ती मिळाली तरी माझ्याच घरीं आहे असें मी समजतों. आमच्या शिवाजीराजांच्या पायांच्या पुण्याईनं असल्या छप्पन्न वतनवाड्या मिळवीन.

**बा. मोहिते** : असं जर आहे तर या सर्वांना घेऊन इथं येण्याची तसदी तरी कां घेतलीस ?

**दादाजी** : मामासाहेब, वतनवाडी मिळवितां येईल, पण माझे वडिलोपार्जित देव मला मिळायचे नाहींत. माझी वतनवाडी वगैरे सर्व घ्या — पण माझे देव आणि माझ्या गोमाता तेवढ्या माझ्या मला द्या.

**बा. मोहिते** : हें पहा, माझ्या हातीं आतां कांहीं नाहीं. बादशाही हुकमानं गाई, देव, देव्हारा सर्व सर्व कांहीं जप्त झालं आहे. पण मी असं म्हणतों, देव देव्हारा जें कांहीं केलं आहे तेंहि बादशहाच्या वतनवाडींतूनच ना ? मग ज्याचा माल ते ठेवणार ? तुम्हाला मागण्याचा अधिकारच काय ?

**दादाजी** : काय, माझे देव बादशहाच्या देणगीचे समजतां ? असल्या छप्पन बादशाह्या माझ्या कुलदेवानं रसातळाला गेलेल्या पाहिल्या आहेत. त्या तुमच्या कालपरवांच्या बादशहाची प्रतिष्ठा ऐकून घेणारा हा वतनदार बच्चा नाहीं. मुकाट्यानं माझे देव नि गाई मला द्या, नाहीं तर ते मिळविण्यासाठीं मला माझे प्राण पणास लावून मिळवावे लागतील.

**बा. मोहिते :** हें पहा, आतां तुम्ही कितीहि जिवाचं रान केलंत, तरी त्या गाई मिळणं शक्य नाहीं. त्या विजापूरच्या वाटेला केव्हांच लागल्या आहेत.

**शिवाजी :** दादा, चल कसा. आतां क्षणाचाहि उशीर न लावतां आपल्या गोमाता आपण अगोदर सोडवून आणूं. आणि मग या कसाबाची चांगलीच चांदी आटवूं.

**बा. मोहिते :** अरे जारे गाई सोडवून आणणारे; एव्हांना त्या विजापूरला पोंचल्यासुद्धां असतील. म्हणे आमची चांदी आटविणार? ती आटविण्यापूर्वी मीच यांच्या देवदेव्हाऱ्यासह सर्वांची चांदी आटवून दाखवितों.

**जिजाई :** दाजी, काय बोलताहे ! तुमचं डोकं तरी ताळ्यावर आहे का ? आपण कोण याची तुम्हाला शुद्ध आहे का ?

**बा. मोहिते :** मी कोण हें मी चांगलं जाणतों आहे. मी कोण याची जाणीव तुम्हालाच नाहीं. पण लक्षांत ठेवा — कर्तुम् अकर्तुम् शक्ति असलेल्या बादशाही सत्तेचा हा मोहिते आधारस्तंभ आहे.

**जिजाई :** आधारस्तंभ आहांत का त्या पापी सत्तेच्या घाण्याला जुंपले गेले आहांत तें डोळ्यावरची परक्या सत्तेची झापड थोडी दूर करून पहा — म्हणजे समजेल.

**बा. मोहिते :** मासाहेब, स्पष्ट बोलतों याबद्दल राग नसावा. पिढ्यान् पिढ्या चालत आलेली ही बादशाही सत्ता आतां तुम्हाला परकी वाटूं लागली काय !

**जिजाई :** दाजी, आमच्या धर्माच्या शिकवणुकीप्रमाणं परकेपणा विसरून आपलेपणा वाढविण्याची आम्हीं शिकस्त केली. आमच्या देवाप्रमाणंच त्यांच्या देवांना मानत आलों. आमचीं शेकडों देवळं डोळ्यांदेखत उध्वस्त होत असतां त्यांच्या देवाला हात लावायची कल्पनाहि मनाला शिवूं दिली नाहीं. इतका आपलेपणा दाखवूनसुद्धां त्यांना आमची कांहींच किंमत नाहीं — याचा थोडा विचार करा.

**बा मोहिते :** म्हणजे ! तुमच्यासारखी बंडखोरी करून, वंशपरंपरेच्या वतन-जहागिरीवर, पाणी सोडायला तयार व्हावं म्हणतां कीं काय ?

**जिजाई :** कसली ही वंशपरंपरेची जहागीर ! यावचंद्र दिवाकरौ, या सनदेंतील शब्दांना खग्रास ग्रहण लावून, कांहीं कारण नसतां तुमच्या हातांनींच ना दादाचं वतन तुम्हीं खालसा केलं ? मग कसलं हें वंशपरंपरेचं वतन म्हणायचं ? या वतन-

जहागिरी म्हणजे आपली मालमत्ता टिकविण्यासाठीं भेदनीतीच्या मंत्रानं भारलेले हे बाले किल्ले आहेत.

**बा. मोहिते :** म्हणूनच वाटतं, देशमुख देशपांड्यांत फंडफितुरी करून बादशहांची सत्ता उलथून पाडण्याचे प्रयत्न सुरू आहेत. मासाहेब, लक्षांत असूं द्या कीं, असा प्रयत्न म्हणजे टिटवीनं समुद्र कोरडा करण्यापैकींच आहे. असल्याच विचारामुळं प्रत्यक्ष तुमच्या वडिलांना नि भावाला दौलताबादेस कंठस्नान मिळालं; याचा इतक्यांतच तुम्हांला विसर पडावा अं !!

**जिजाबाई :** विसर! विसर केव्हांहि पडणार नाहीं. आणि अंतःकरणाला झालेली जखम केव्हांहि बुजणार नाहीं. दाजी! पण तुम्ही हें पक्कें लक्षांत ठेवा कीं, त्या जातिवन्त मराठ्यांनीं, मराठी धर्मासाठीं प्राण दिला!—पण तुमच्याप्रमाणं, आपल्या गोमाता कसाबाच्या सुरीखालीं देण्याची कल्पनासुद्धां त्यांच्या मनाला कधीं शिवली नाहीं.

**पिराजी :** [ प्र. क. ] धनीसाहेब, गाई केव्हांच रवाना झाल्या, आणि आपल्या हुकमाप्रमाणं सोनाराला घेऊन आलों आहे. तो यायला तयार होत नव्हता, पण शेवटीं धक्के मारून आणावा लागला. आपल्या हातून हें काम व्हायचं नाहीं म्हणतों आहे.

**बा. मोहिते :** कसं काम व्हायचं नाहीं तेंच मला बघायचं आहे. चवदावं रत्न दाखविल्याशिवाय, त्याचा हात उचलायचाच नाहीं. जा, देव्हारा नि देव भरून ठेवलेली पेटी घेऊन ये. [ पिराजी जातो

**जिजाई :** दाजी, मी कळकळीनं तुम्हाला सांगतें कीं, आपल्या देवता स्वार्थाच्या भटींत घालून आपल्याच हातांनीं आपल्या धर्माची राखरांगोळी करूं नका. अधिकारमदाच्या पाठीमागं लागून बहकलेल्या मनाला थोडा आवर घाला.

**बा. मोहिते :** मला उपदेश करण्यापेक्षां, पोथ्यापुराणांतील काल्पनिक गोष्टींनीं बहकलेल्या आपल्या मनाला आपणच आंवर घाला. धर्मकर्माच्या थोतांडापाठीमागं लागून बादशहांची इतराजी ओढवून घेण्याइतका मी मूर्ख नाहीं. पिराजी, चल आण लौकर!

**जिजाई :** [ पेटी घेऊन येणाऱ्या पिराजीस आडवून ] कुठं घेऊन चाललास! ठेव! अगोदर ठेव इथं!!

**बा. मोहिते :** अरे, ये पिऱ्या, असा दगडासारखा उभा काय आहेस ? चल – चल म्हणतो ना ? चल...उचल पाऊल.

**जिजाई :** खबरदार पुढं पाऊल टाकशील तर. ठेव, ठेव ती पेटी अगोदर खालीं. [ पेटी खालीं ठेवतो ] स्वार्थांधा, इतक्या काकुळतीनं सांगितलं तरी दगडासारख्या तुझ्या हृदयाला पाझर फुटत नाहीं ! केवळ टीचभर पोटाच्या खाईसाठीं हें पापकर्म करायला तयार झालास काय ? तुला पैसा पाहिजे ? घे. हा माझा नवरत्नाचा हार घे, आणि तुझ्या पोटाची आग शांत कर. चल घे, आणि काळं तोंड घेऊन चालता हो. [ हार घेऊन जातो.

—आंतून संगीत सूर ऐकूं येतात.

देशद्रोही तितुके कुत्ते मारुनि घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं ॥ १ ॥

[ विजापुराकडे नेत असलेल्या गाई सोडवून आणतात. मावळे लोकांना दादाजी. प्रभू गाई वाटतो. मावळे लोक आपापल्या घरांत – झोंपडींत गाई नेतात. त्यांचें दूध काढून जोरजोडी सुरू करतात व शस्त्रें घेऊन घरांतून बाहेर पडतात.

[ २ ]

**स्थळ :**— तळघरांत जाण्याची चोरवाट.

**वे. तुराजी :** [ पिराजीचा पहारा चालू असतां प्रवेश करून ] कलगी, घे यळकोट – यळकोट घे...

**पिराजी :** ... गांवांत भीक मागायचं सोडून दे ! ही वाघ्याची संक्रान्त म्हटलं इकडं कां वळली ? माझ्या कडेकोट बंदोबस्तोचा यळकोट तर नाहीं ना करायचा बेत तुमचा ?

**वे. तुराजी :** छे, छे ! असं काय भलतंच बोलतां ? आमचा खंडेराया, असा तसा देव नाहीं बरं ! एकंदरींत तुमचं नशीब थोर आहे खरं. बाबा खंडेराया, भक्ताला पाहून घे रे बाबा. [ कपाळास भंडारा लावूं लागतो

**पिराजी :** मुरळीला घेउन दारोदार फिरायचं, तुमच्या कपाळाला लागलं आहे तेवढं पुरें झालं आणि तें आमच्या कपाळाला कां लावतां ?

**वे. तुराजी :** काय सांगावं तुम्हाला, तुमच्यासारखे नशीबवान तुम्हीच बरं. प्रत्यक्ष खंडेराया चालून आला आहे तुमच्याकडं.

**पिराजी :** कशाला? माझा खेळखंडोबा करायला कीं काय ?

**वे. तुराजी :** असं कां म्हणतां? हा भंडारा तुमचं सोन्याहून पिवळं केल्याशिवाय सोडणार नाहीं बरं. माझ्या भंडाऱ्याचा हातखंडा गुण तरी बघा. तुम्ही मनांत धरलेलं काम जर का फत्ते झालं नाहीं, तर आमचीं नांवंच बदलून ठेवूं. हें बघा, तुम्ही न सांगतां तुमच्या मनांतलं ओळखूं का ?

**पिराजी :** बोल बघूं माझ्या मनांत काय आहे तें.

**वे. तुराजी :** हें बघा, नुकतीच ओळख झालेल्या माणसाबरोबर ती ओळख पक्की करण्याच्या विचारांत तुम्ही आहांत. कां, खरं कीं नाहीं ? पण तुम्हाला सांगून ठेवतों, त्या माणसाला मात्र तुम्हीं खात्रीनं ओळखलं नाहींत.

**पिराजी :** म्हणजे ! तूं मला अगदीं हा समजतोस कीं काय ?

**वे. तुराजी :** छे, छे, तसं कांहीं नाहीं. बरं, पण राव, असं इच्याकडं टक लावून काय बघतां नि विचार कसला करतां ?

**पिराजी :** विचार कांहीं नाहीं. या तुझ्या मुरळीचा तोंडवळा कुठं तरी पाहिल्या-सारखा वाटतो. कुठं पाहिलं तें आठवतों आहे.

**वे. तुराजी :** अहो महाराज, खरं सांगूं का ? मनीं असे तें स्वप्नीं दिसे. माझं बोलणं खरं व्हायला लागलं; आलं जवळ, म्हाळसे होऊं दे सुरवात—

> माझा मार्तंड देव हा राया मल्हारी ॥
> म्हाळसा देवी, त्याच्या संगें सुंदरी ॥
> त्याच्या वारीसाटीं वाघ्या झाला भिकारी ॥
> ढळती दोन्हीं बाहि कुंचे, भोंता भक्त गणनाचे ॥
> भंडाऱ्याची घ्याया लुटी भावीक हो या ॥
> दैत्यजना माराया हात उचलला,
> भक्तजना ताराया शंभू प्रगटला ॥ १

**लाडोजी :** [ प्र. क. ] अरे ये पिराजी, काय चालवलं आहेस ! हे असले तुझे ढंग बाबांनीं पाहिले तर काय करतील ठाऊक आहे का ?

**पिराजी** : ठाऊक नसायला काय झालं ? पण धनीसाहेब, हें जें काय काय करतों आहे, तें माझ्यासाठीं करतों आहे असं तुम्हाला वाटतं ? अहो धनीसाहेब, हें सगळं तुमच्यासाठींच आहे बरं !

**लाडोजी** : काय ? या वाघ्या – मुरळीला आमच्यासाठीं बोलावून आणलीस ?

**पिराजी** : मीं कशाला बोलावून आणूं ! तुमचं नशीब थोर म्हणून देवानंच ऐन वेळीं तुमच्याकडं यांना पाठविलं आहे. अहो धनी, यांच्याजवळ जो पिवळा अंगारा आहे त्याचा असा काय विलक्षण गुण सांगतात, कीं मनांतलं काम फत्ते म्हणून समजावं !

**लाडोजी** : खरं कीं काय ?

**वे. तुराजी** : खोटं कशाला सांगूं ? पाहिजे तर प्रत्यक्ष अनुभवच पहा. वशीकरणांत तर याचा गुण हातखंडा आहे. कुणा माणसाला वश करून घ्यायचं असेल त्याला माझा भंडारा म्हणजे लग्नाची हळद लागली म्हणून समजा.

**कलगी** : होय. माझ्या देवाचा भंडारा असा तसा नाहीं ? ज्या ठिकाणीं तो पडेल तो बालेकिल्ला सर झालाच म्हणून समजा.

**पिराजी** : अस्सं काय ? मग तुमचा तो भंडारा मला थोडा देता कां ? वेळ प्रसंगाला जरा जवळ ठेवावा म्हणतों.

**लाडोजी** : ये, तें तुमचं राहूं दे. काय रे वाघ्या, या तुमच्या भंडाऱ्यानं माझं काम फत्ते होईल म्हणतोस ?

**वे. तुराजी** : शंका कां वाटते तुम्हाला ? हें बघा, जर का तुमच्या मनाप्रमाणं काम झालं नाहीं, तर तुम्ही सांगाल ती शिक्षा भोगायला मी तयार आहें.

**लाडोजी** : मग दे बघूं तुझा तो भंडारा मला. पाहूं तर कसा काय गुण येतो तो. पण लक्षांत ठेव, जर का गुण आला नाहीं तर या इनामदार बच्चाशीं गांठ आहे. पिराजी, मी येईपर्यंत तूं याला इथून सोडूं नकोस. पाहाऱ्यांत ठेव.

**वे. तुराजी** : छे, छे ! माझ्या हातांतील भंडारा तुमच्या हातांत गेला तर त्याचा गुण येणार नाहीं. ज्याला वश करायचं त्याला मीं स्वतःच्या हातानें भंडारा लावला पाहिजे. हातगुणाशिवाय असलीं कामं होत नसतात.

**लाडोजी** : म्हणजे या इनामदार बच्चाचा हातगुण चांगला नाहीं असं तुला वाटतं ? बापजाद्यांनीं मिळवून ठेविलेल्या गडगंज संपत्तीची हातोहात वाताहात

करणाऱ्या या इनामदार बच्चाचा हात ठाऊक नाहीं तुला ! थांब, तुलाच माझा चांगला हात दाखवितों.

**वे. तुराजी** : तसं नव्हे साहेब, मी काय म्हणतों तें ऐकून तरी घ्या.

**लाडोजी** : बस्सऽ, तें ऐकण्याची जरूरी नाहीं.

**पिराजी** : धनीसाहेब, हा म्हणतो त्याप्रमाणं त्यालाच तिथं घेऊन जाऊन एक वेळ अनुभव घ्यायला काय हरकत आहे ?

**लाडोजी** : अरे, पण ती जागा कुणाला दाखवायची नाहीं हें तुला ठाऊक नाहीं का ?

**पिराजी** : धनीसाहेब, तुमच्या मनांत असेल तर एक युक्ती सांगतों त्याप्रमाणें करा. हें बघा, त्याचे डोळे बांधून तेथें घेऊन जा, आणि आपलं काम झालं कीं पुन्हां डोळे बांधून इथं आणून सोडा – म्हणजे झालं.

**कलगी** : कांहीं हरकत नाहीं. आमचे डोळे बांधून घेऊन चला. मग तर हरकत नाहीं.

**पिराजी** : नाहीं, म्हटलं नाहीं ! तुम्हाला नाहीं जातां यायचं याच्याबरोबर. तुम्हाला इथंच माझ्या पाहाऱ्यांत बसलं पाहिजे. होय कीं नाहीं धनीसाहेब !

**लाडोजी** : होय. नाहीं तर मी इला तिथं घेऊन गेलों आणि तिनं हिला पाहिलं तर मुरळीच्या नादाला लागल्याचा तिला संशय यायचा आणि यांचा हातगुण पाहण्याऐवजीं हात दाखवून अवलक्षण व्हायचं. लग्न होईपर्यन्त असल्या गोष्टी नजरेला न पडण्याचं इनामदारी राजकारण दाखविलं पाहिजे. पिराजी, बांध याचे डोळे. [ वे. तुराजीचे डोळे बांधून लाडोजीराव घेऊन जातो

**पिराजी** : कलगी, मीं तुला केव्हांच ओळखलं आहे. सोंग पण सोंग. बतावणी तर काय बेमालूम केलीस ! एकंदरींत चतुर आहेस खरी.

**कलगी** : तें राहूं दे. सोंगढोंग करून आज कशी तरी इथपर्यन्त आलें. पण मला वाटेल त्या वेळीं इथं कसं येतां येईल ?

**पिराजी** : अग, तूं कां काळजी करतेस ! वाटेल त्या वेळीं तुला माझेकडे येण्यासाठीं मी तुला एक चोरवाट दाखवून ठेवतों, म्हणजे झालं कीं नाहीं ?

**कलगी** : असं कांहीं झालं म्हणजे दुधांत साखरच पडली म्हणायची.

**पिराजी** : पण जर का ही गोष्ट बाहेर फुटली म्हणजे दुधांत साखर पडण्याऐवजीं मिठाचा खडा पडेल, ठाऊक आहे ना ?

**कलगी** : तुम्हाला काय मी अशी तशी असं वाटतं !

**पिराजी** : छे, छे, तसं कांहीं नाहीं. चल ती चोरवाट दाखवितों. फार लांब नाहीं. तुझ्या त्या ताईसाहेब ज्या बुरजाखालीं तळघरांत ठेवल्या आहेत, त्याच बुरजाच्या कोपऱ्यांतून ती वाट आहे. चल लौकर, आमचे धनी यायच्या आंत इथं परत आलं पाहिजे.

**कलगी** : चला लौकर. तुम्ही मला फक्त ती चोरवाट दाखवा आणि लगेच पहाऱ्यावर हजर व्हा. रात्रीं बेरात्रीं मला येतां येण्यासाठीं मी त्या चोरवाटेवर माझ्याजवळील भंडाऱ्यानं खुणा करून झटकन् तुमच्या पाठोपाठ इथं येते. चला करें लौकर. [ जातात

[ सईबाई ज्या बुरजाच्या तळघरांत ठेविलेली असते तो बुरूज पिराजी कलगीस दाखवितो व त्याजवळील किल्ल्यावर येण्याची चोरवाटहि दाखवितो. कलगी भंडाऱ्याच्या खुणा करीत जाते, पिराजी पहाऱ्यावर हजर होतो.

[ ३ ]

**स्थळ** :— बुरुजाखालील तळघर.

**सईबाई** : [ सचिंत मनन करीत आहे ]

ये सदया, प्रभुराया, भेट झणिं सखया,
दावि तव माया, शांत करि हृदया ॥
शिवप्रभू जय । शिवप्रभू जय ॥ १ ॥

**लाडोजी** : [ वेषधारी तुराजीसह ] म्हटलं, हा जातिवंत इनामदार बच्चा खुद्द जातीनं विचारतो कीं, कसलं मनन चाललं आहे. [ बोलत नाहींसें पाहून ] काय बोलत नाहींस ? आणि हालतहि नाहींस ! काय झालं आहे तुला ! म्हटलं, स्वारी शुद्धीवर तरी आहे का ?

**वे. तुराजी** : साहेब, तुम्ही थोडे बाजूला व्हा बघूं.

**लाडोजी** : वाः ! हा इनामदार बघा हिला जवळ करायला बघतो आणि तूं मला बाजूला व्हा म्हणतोस ?

**वे. तुराजी** : तसं नव्हे साहेब, यांना चांगलं शुद्धीवर आणण्यासाठींच मला तुम्हीं घेऊन आलांत ना ? बघा. माझा हातगूण तरी बघा. [तुराजीचे शब्द ऐकून सईबाई कावरीबावरी होते] बघा, या वाघ्याच्या पहिल्याच सलामीचा प्रभाव दिसला कीं नाहीं ? काय सांगावं तुम्हांला, माझ्या देवाचा महिमाच आहे तसा.

**लाडोजी** : होय कीं ! आहे खरा चमत्कार.

**वे. तुराजी** : चमत्कार ! काय सांगावं तुम्हाला, माझ्या देवाचे एकेक चमत्कार ऐकाल तर थक्क व्हाल. वाटेल त्या ठिकाणीं वाटेल त्या रूपानं जाऊन गांजलेल्याला सोडविणं हें तर त्याचं ब्रीदच आहे.

**लाडोजी** : एकूण हिचे बाबतींत हताश झालेल्या या इनामदार बचाला, तो तुझा देव शेवटीं हात देईल म्हणतोस ?

**वे. तुराजी** : देईल म्हणजे ? अहो देणारच ! मीं तुम्हाला मघाशींच सांगितलं नाहीं का, कीं दुःखांत पडलेल्याला हात देणं आणि दुःख देणाऱ्याला हात दाखविणं हें तर त्याचं ब्रीदच आहे.

**लाडोजी** : काय सांगूं वाघ्या, माझ्याबरोबर लग्न करून सुख मानावं, याच-साठीं आमच्या जिवाची कोण आटापीट, काय यातना होताहेत, त्या आमच्या आम्हालाच माहीत. त्या तुझ्या देवालासुद्धां ठाऊक नसतील.

**वे. तुराजी** : असं कसं म्हणतां साहेब, माझ्या देवाला ठाऊक नाहीं अशी एक तरी गोष्ट आहे का ?

**लाडोजी** : काय ? त्या तुझ्या देवाला सर्व ठाऊक आहे असं म्हणतोस ? काय रे वाघ्या, या इनामदार बचाला हिच्या पायीं मार खावा लागला, हें सुद्धां त्याला ठाऊक असेल !

**वे. तुराजी** : साहेब शंका कशाला, सर्व कांहीं त्याला ठाऊक आहे. तो कुठं नाहीं ? सर्व ठिकाणीं तो आहे. इतकंच नव्हे, वाटेला त्या ठिकाणीं वाटेल त्या रूपानं प्रकटसुद्धां होतो. फार काय सांगूं, इथंसुद्धां एखाद्या रूपानं प्रकट होईल.

**लाडोजी** : म्हणजे, तो देव आहे का भूत आहे ?

**वे. तुराजी** : तसं नव्हे साहेब, या माझ्या भंडाऱ्याच्या रूपानं प्रगट होऊन भक्ताला हात देईल.

**लाडोजी** : हात देण्याऐवजीं, तो तुझा देव या इनामदार बच्चाला हात तर नाहींना दाखविणार ?

**वे. तुराजी** : छे, छे ! असली भलतीच शंका घेऊं नका. [ सईबाईस ] हं, ताईसाहेब, मनांत कोणतीहि शंका न धरतां मी देतों हा देवीचा प्रसाद घ्यावा म्हणजे ती आदिमाता तुमचं कल्याण करील.

[ कवड्याची माळ देतो; सईबाई ती गळ्यांत घालते

**लाडोजी** : कायरे वाघ्या, तूं खंडेरायाचा भक्त म्हणतोस आणि इला कवड्याची रे माळ कशी देतोस ?

**वे. तुराजी** : अहो साहेब, हा प्रसाद माझ्या देवाच्या आदिमातेचा आहे. आणि या आमच्या मातेला आदिमातेचा प्रसाद दिल्याशिवाय आपलं काम फत्ते होणार नाहीं.

**लाडोजी** : वाघ्या, हिऱ्यामोत्याचे हार घेऊन हिच्या पाठीमागें लागलों तरी माझेकडे — नव्हे या इनामदार बच्चाकडं ढुंकूनहि बघितलं नाहीं आणि तूं दिलेली ही भिकार कवड्याची माळ घेऊन गळ्यांत घातली. एकंदरींत हें भिकार लक्षण. कांहीं ठीक दिसत नाहीं.

**वे. तुराजी** : साहेब असे निराश कां होतां ? माझ्या देवाचा महिमा ! माझ्या आदिमायेचा प्रसाद ! चमत्कार दाखविल्याशिवाय रहाणार नाहीं. पहा ! माझ्या आदिमातेच्या प्रसादाचा चमत्कार !!

**लाडोजी** : होय कीं, आहे खराच चमत्कार. सर्वच पारडं एकदम फिरल्यासारखं दिसतं. बघ, बघ, चेहरा कसा फुलत चालला आहे. वाघ्या, एकंदरींत या इनामदार बच्चाचं काम फत्ते होणार तर ?

**वे. तुराजी** : हं, आतां वेळ दवडूं नका. मी सांगतों तसं तसं करा म्हणजे काम फत्ते झालचं म्हणून समजा. हं ! या असे पुढें. हा माझ्या देवाचा भंडारा दोन्ही हातांनीं घट्ट धरून, असं इकडं तोंड करून डोळे मिटून बसा, आणि मी सांगेन त्या वेळीं डोळे उघडा. पण जर का मधेंच डोळे उघडाल तर ते कायमचेच मिटतील. छे, तसा कांहीं चुकून घोटाला व्हायला नको म्हणून मी तुमचे डोळे बांधूनच ठेवतों म्हणजे काळजी नाहीं. [ लाडोजीचे डोळे बांधतो ] हं. आतां आपली जी काय इच्छा असेल त्याचं मनन करा.

**लाडोजी :** अरे ये वाघ्या, हें काय ? जिकडं पाहावं तिकडं काळाकुट्ट अंधारच दिसतो.

**वे. तुराजी :** म्हणजे ? कुणाचं कांहीं काळंबेरं करायची इच्छा तर मनांत धरली नाहीं ना ? साहेब, मनीं असे तें दृष्टी दिसे असं म्हणतात.

[पत्र काढून सईबाईस देत असतां बा. मोहिते प्रवेशून व तें काढून घेतो

**लाडोजी :** वाघ्या, अरे ये वाघ्या, बोलत कां नाहींस आणि एकदम सामसूम कां झालं. ? अरे य, लाकर आटप, बाबा येण्याची वेळ आहे, या ठिकाणीं तुला आणलेलं त्यांनीं पाहिलं, तर त्या बेट्याच्या अंगांचा तिळपापड होईल. म्हणून म्हणतों, लौकर आटप आणि एकदांचे माझे डोळे उघड.

**बा. मोहिते :** [ डोळे सोडतो ] पहा, चांगले डोळे उघडून काय प्रकार आहे तो पहा ! मूर्खा, डोळे असून असा कसा आंधळेपणानं वागतोस ? कांहीं शरम वाटते का तुला ?

**लाडोजी :** हां, बाबा या मानाच्या मानकऱ्याचा बायकोच्या देखत अपमान कराल, तर बाबाला बाप म्हणणार नाहीं हें खूप समजून रहा.

**बा. मोहिते :** कपाळकरंट्या, असा कसारे निपजलास !

**लाडोजी :** बाप तसा बेटा हा असायचाच. बरं, बाबा, माझ्या नांवानं एवढं कोकलायला मीं केलं तरी काय ?

**बा. मोहिते :** अजून तुझे डोळे उघडत नाहींत. पहा, नीट डोळे फाडून पहा !

[पत्र देतो

**लाडोजी :** [ पत्र वाचतो ] ‘दंडवत वि. वि. आपण वाड्यांतून नाहींशा झाल्यापासून आम्ही तुमच्या शोधांत आहोंत. आपण तोरणा किल्ल्यांत असल्याचें समजतांच, पिराजीस मथवून, वाघ्यामुरळीचीं सोंगं घेऊन इथं आलों आहोंत. आपला ठावठिकाणा शिवाजीराजांस कळवून, सोडवून नेऊं याची खात्री बाळगावी. आपण तयारींत असावें. कळावें हे वि.’ आपले सेवक कलगी, तुराजी — हे असे आहेत काय ? असं काय ! बाबा, पहातां काय असे ? प्रत्यक्ष फितुरी झालेली धडधडीत दिसत असतां, तुम्ही आपले दगडासारखे उभे ! कोण — बाबा आहांत का भिंताड आहांत ? पहातां काय असे ? पकडा या हरामखोराला नाहीं तर हा कुठं तरी पळून जाईल.

**बा. मोहिते** : कुठं पळून जाईल ? माझ्याशीं गांठ आहे म्हणावं. या फितुराला आतां स्वर्गाशिवाय वाटच नाहीं दुसरी.

**लाडोजी** : होय बाबा. याची वाट लावायला तुम्ही स्वतःच जा याचेबरोबर.

**बा. मोहिते** : [ सईबाईस ] काय ग कारटे, इतक्या पाताळांत तुला आणून ठेवली, तरी तुझीं पाताळयंत्री कारस्थानं बंद होत नाहींत. थांब, यापुढं तुझी बिलकूल गय करतां कामा नये.

**लाडोजी** : होय बाबा. आतां इला इथून काढून दुसरीकडं कुठं तरी नेऊन ठेविली पाहिजे. त्या शिवाजीला ही जागा समजली वाटतं.

**सईबाई** : हें पहा, तुम्ही मला सप्तपाताळांत जरी नेऊन ठेवलं तरी माझा परमेश्वर, माझा देव तेथूनहि मला सोडवून नेईल, याची खात्री ठेवा.

**बा. मोहिते** : असं का ? थांब. तुझ्या त्या देवाला तरी उगीच कशाला तसदी ! आम्ही होऊनच तुला त्या देवाच्या घरीं पाठवितों. चल बाळ, आमच्या नाकाला चुना फांसणाऱ्या या कारटीला चुना दगडांत गाडूनच हिला हिच्या देवाकडं पाठवूं.

**लाडोजी** : होय बाबा. तो बेटा शिवाजी इथं आला आणि हिला नेण्याचा प्रयत्न करूं लागला तरी ही जिवंत तरी त्याच्या हातीं नाहीं लागली पाहिजे, असंच कांहीं तरी करा. मी म्हणतों हिला दुसरीकडे नेण्यापेक्षां ह्या ठिकाणींच हिला देवलोक दाखवा. या तळघराला येणारी वाट चुनादगडांनीं भरून काढा. या ठिकाणीं ही तडफडून तडफडून अन्नपाण्यावांचून मेली पाहिजे. आणि या फितुरालाहि पण इथंच गाडून टाका !

**बा. मोहिते** : छे, याला असा इथं सोडतां कामा नये. त्याला फटक्यांखालीं झोडपून, या कामांत कोण कोण सामील आहे हें पाहतों. आणि मग माझ्या डोळ्यांदेखत याचा कडेलोट करवितों.

**लाडोजी** : हिला आम्ही जिवंत गाडायला तयार झालों तरी, ही आपली गप्पच ! आमचेकडे येत नाहीं, सोडा म्हणून गयावया करून पाया पडत नाहीं—तेव्हां ही आहे तरी कोण ?

**सईबाई** : मीं कोण याची ओळख अजून पटली नाहीं ? मी कोण हें पुन्हां सांगतें.—प्राण गेला तरी परक्या सत्तेपुढें मान न वांकविणाऱ्या अस्सल

मराठ्याची ही मुलगी आणि मायभूमीला सोडविणाऱ्या छत्रपतींची ही भावी राणी आहे, समजलांत ?

**लाडोजी :** समजलों ! समजलों !! अहो मायभूमीला सोडविणाऱ्या राजाच्या राणीसाहेब ! आतां आपण या मायभूमीच्या पोटांतच कायमचं राणीपद उपभोगा, बरं का ? बाबा, चला, यांच्या राज्याचा पाया चांगला चुनेगची करूं म्हणजे हिच्या त्या राजाला राज्याभिषेकाऐवजीं नेत्राभिषेक करायला हरकत नाहीं !!

[ तुराजीस धरून घेऊन जातात

[ ४ ]

— **स्थळ** — तळघराचा चोर दरवाजा —

**पिराजी :** [ पहारा करीत ] बरी असेल वेळ तर गाजराचं होईल केळ म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. आमच्या गांवांतील लोक मला म्हणत होते, तुझ्यासारख्या भटकभाई सटक सीतारामाला मुलगी देणार कोण आणि तुझं लग्न होणार कसं ! पण म्हणावं बेट्यांनो थोडे थांबा; या पिराजीची वरात मोठ्या घोड्यावरनं तुमच्या देखत मिरवीत नेऊन तुम्हाला खालीं पहायला लावीन तरच नांवाचा पिराजी होईन. [ बा. मोहिते प्र. क.

**बा. मोहिते :** एकूण चतुर्भुज होऊन, मोठ्या घोड्यावरून मिरवायची तुला हौस आहे म्हणतोस ?

**पिराजी :** धनीसाहेब, उगीच चोरून कशाला ठेवूं ? हौस आहे खरी, पण माझी असली हौस आपल्याशिवाय कोण पुरविणार ?

**बा. मोहिते :** थोडा थांब हं. ती तुझी हौस लौकरच पुरवितों. पण काय रे, मी इथून नुकताच तळघरांत गेलों तेव्हां तूं इथं नव्हतास. पहारा सोडून कुठं गेला होतास ? हें पहा, काय भानगड आहे ती मुकाट्यानं सांग, आणि जर का लपवालपवी करशील तर माझ्याशीं गांठ आहे ध्यानांत ठेव !

**पिराजी :** धनीसाहेब, उगीच कशाला लपवालपवी करूं ? जन्माच्या गांठीची गोष्ट, तिच्यांत असं कसं करून चालेल ?

**बा. मोहिते :** तुझी बडबड नको आहे मला. पहारा सोडून कुठं गेला होतास तें खरं सांग.

**पिराजी** : खोटं कशाला सांगूं, धनीसाहेब ? इथं एक मुरळी आली होती ती म्हणाली, मला थोडा किल्ला पहावयाला मिळेल का ? तेव्हां तिला किल्ला दाखवायला दोन पावलं तिच्याबरोबर गेलों होतों.

**बा. मोहिते** : मूर्खा, असा कसा रे तूं बेअकली ! सोंपविलेल्या कामगिरींत बिलकूल कुचराई करूं नको, अशी तुला मीं सक्त ताकीद दिली होती ना !

**पिराजी** : मग मीं कुठं कुचराई केली ? धनीसाहेब, तिनं मला जी माहिती विचारली ती सांगण्यांत बिलकूल कुचराई केली नाहीं. किल्ल्याची अगदीं खडान्‌खडा माहिती तिला दिली आणि इकडं पहाऱ्याच्या कामगिरींतहि कुचराई न व्हावी म्हणून तिला तिथंच सोडून मी इथं पुन्हां हजर झालों आहे.

**बा. मोहिते** : अरे गाढवा, जिला तूं किल्ला दाखवायला नेलंस, ती कोण आहे हें ठाऊक आहे कां तुला ?

**पिराजी** : धनीसाहेब, मला तुम्हीं अगदींच गाढव समजलां होय ? ती कोण आहे हें समजल्याशिवाय का मी तिला किल्ला दाखवायला गेलों ?

**बा. मोहिते** : म्हणजे, समजून उमजून तूं यांत सामील आहेस ?

**पिराजी** : धनीसाहेब, पण एवढं रागवायला काय झालं ? मी म्हणतों नवऱ्यानं बायकोला सामील व्हायचं नाहीं, तर मग व्हायचं तरी कुणाला ?

**बा. मोहिते** : मुरळीला बायको म्हणून मला फसवायला पहातोस ?

**पिराजी** : पण धनीसाहेब, ती खरोखरीची मुरळी नाहीं. ती कोण आहे हें तुम्हांला समजलं, कीं लागलीच तुम्ही माझ्या दोन हाताचे चार हात करून टाकाल.

**बा. मोहिते** : आहे ! आहे !! त्याच तयारींत आहे. थोडा थांब. काय रे ? जर ती खरी मुरळी नाहीं, तर तिच्याबरोबरचा वाघ्याहि खोटा असला पाहिजे. तुला हें माहीत होतं आणि हें समजून तूं त्याला आंत सोडलंस !

**पिराजी** : धनीसाहेब, तुमच्या गळ्याची शपथ घेऊन सांगतों यांतलं मला कांहीं ठाऊक नाहीं; आणि मीं त्याला आंत सोडलं नाहीं. त्याच्याजवळच्या भंडाऱ्याचा गुण पहाण्यासाठीं धाकटे धनीसाहेब त्याला घेऊन गेले. पण मी म्हणतों, धनीसाहेब, यांत इतक रागावण्यासारखं झालं काय ?

**बा. मोहिते** : काय झालं आणि काय करायचं, तेंच दाखवायला इथं आलों आहे, समजलास ! बाळ, याच्या त्या वाघ्यास इकडे आण पाहूं. [ तुराजीस घेऊन येतात

**पिराजी** : आं ! अरे हा तर तुराजी ! धनीसाहेब, याला कैद केलंत, छान झालं माझ्या दोन हाताचे चार हात होण्याच्या आड, हाच येत होता [ तुराजीस ] बेट्या, आतां येशील का माझ्या आड !

**बा. मोहिते** : हाच तुझ्या आड येत होता नाहीं का ? आतां याचा कांटा काढून टाकतों म्हणजे तुला चतुर्भुज व्हायला कांहीं हरकत नाहीं. कोण आहे रे तिकडे ? [ सेवक येतो ] करा या हारामखोराला चतुर्भुज ! आणि फितुर झाल्याबद्दल, प्रत्येक तिकटीवर पांचपांच फटके लगावून, गाढवावरून याची धींड काढा आणि मग माझ्याकडे घेऊन या !

**लाडोजी** : अरे असं तोंड कां वाकडं करतोस ? तुला वरातीची हौस होती ना ? मग — ती आतां आयतीच निघते आहे ! मोठ्या घोड्यावरून नाहीं तर नाहीं, निदान छोट्या घोड्यावरून तरी निघेल !

**पिराजी** : असं कसं म्हणतां जी धनी ? तुमची वरात लांब सोंडेच्या हत्तीवरनं निघायची, ती जर बिनसोंडेच्या हत्तीवरनं निघाली तर तुम्हांला आवडेल होय ?

**लाडोजी** : अरे लुच्चा ! डुकराच्या बच्चा ! या इनामदार बच्चाची थट्टा करतोस ? पाहतां काय, न्यारे याला आणि बाबांनीं फर्माविलेली शिक्षा झटकन् अमलांत आणा !

[ सर्व जातात

[ भंडारा पडलेल्या खुणांच्या आधारानें कलगी शिवाजीला आणि त्याच्या मावळ्यांना चोरवाटेनें किल्ल्यावर नेते. पिराजीची धिंड गाढवावरून निघालेली पाहण्यास बहुतेक पहारेकरी गेलेले असतात. रिकाम्या दरवाज्यांतून मावळे आंत शिरतात. ज्या बुरजांत सईबाईला कोंडून ठेवलेली असते तो बुरूज कलगी स्वतः शिवाजीला दाखविते. शिवाजीचे लोक बुरूज पाडीत असतां मोहरांचा हंडा लागतो. शिवाजी ओंजळींत मोहरा घेऊन पाहात असतां सईबाईचे दोन हात खिंडारांतून बाहेर निघतात आणि शिवाजीच्या गळ्यांत कवड्याची माळ पडते. दगड बाजूस काढून सईबाईस वर घेतात. इतक्यांत तुराजीचा कडेलोट होणार असल्याची वर्दी येते. सर्व मंडळी तिकडे जातात.

[५]

—**स्थळ** : किल्ल्याच्या महाद्वारावरील निशाणाची जागा;
तुराजीस गिरफदार करून आणला आहे.—

**बा. मोहिते** : तुराजी, तुला मुद्देमालासह, ऐन पुराव्यासह, फितुरांत पकडला आहे. अन्नदात्या खाविंदांशीं बेमानगिरी करणाऱ्या तुझ्यासारख्या दगलबाजाला —

**तुराजी** : कोण दगलबाज? मायभूमीशीं, जातगोताशीं निमकहराम होणारा दगलबाज – कीं मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठीं छातीचा कोट करून कडेलोटाला तयार होणारा दगलबाज ?

**बा. मोहिते** : काळाच्या दाढेंत मानगुटी अडकली तरी तुझी गुर्मी उतरत नाहीं अं ?

**तुराजी** : कां उतरावी? स्वतःचं घर परक्याच्या हातांत देऊन त्यांनीं दिलेल्या तुकड्यावर उसनी ऐट मिरवणारी अवलाद नाहीं मी! मी शिवाजीराजांच्या तालमींतला नेकजात मराठा बच्चा आहे.

**बा. मोहिते** : प्राणावर बेतली तरी नेकजातीच्या गोष्टी बोलतोस.

**तुराजी** : आपल्या मायमाउलीसाठीं, कडेलोटासारख्या मानाच्या मरणाला कवटाळणारा नेकजात मराठा, फितुरीनं मिळालेल्या पराच्या गाद्यावर कुत्र्याच्या मोतानं मरायला कधींच तयार नसतो.

**बा. मोहिते** : बस्स. या पुढं तुझी शिवराळ जीभ चालू देतां कामा नये! घाला रे याला भोतांत आणि करा याचा कडेलोट!

**लाडोजी** : [ धांवत येऊन ] बाबा, दगा! बाबा – घात झाला हो घात!

**बा. मोहिते** : अरे काय, झालं तरी काय असं? आणि असा घाबरलास काय म्हणून?

**लाडोजी** : आतां काय सांगूं कपाळ माझं! इथल्या किल्लेदाराला वश करून घेऊन — त्या डोंगरांतल्या उंदरानं सगळा किल्ला पोखरला आहे.

**बा. मोहिते** : कायं? किल्लेदारहि फितुर झाला म्हणतोस? बरं आहे म्हणावं, बादशाहाकडून तुझीं पाळंमुळं खणून काढीन तरच नांवाचा मोहिते!

**लाडोजी** : बाबा, त्याचीं पाळंमुळं खणून काढाल त्या वेळीं काढा म्हणा, पण त्या शिवाजीनं आमचींच पाळंमुळं उखडून टाकलीं – सईला ठेवलेला बुरूज खणून काढून सईला तर ताब्यांत घेतलीच, पण बेट्यानं तिचेबरोबर मोठा हुंडाहि लाटला.

**बा. मोहिते** : अरे म्हणतोस तरी काय?

**लाडोजी** : दुसरं काय म्हणाणार! बुरूज खणून सईला काढीत असतां मिळालेला मोहरांचा हंडा म्हणजे हुंडाच नाहीं का बाबा ?

**बा. मोहिते** : मग आतां आमचा सर्वस्वींच घात झाला म्हणायचा ! आणि या सगळ्या अनर्थाचं मूळ हा फितूरच, तेव्हां अगोदर याचीच वाट लावली पाहिजे.

**लाडोजी** : होय. आणि यानंच त्यौ मुरळीकडून, सईला ठेवलेला बुरूज आणि किल्ल्यावर येण्याच्या चोरवाटा, भंडाऱ्याच्या खुणा करून शिवाजीला दाखविल्या आणि त्याच चोरवाटेनें त्यानं किल्यावर डल्ला मारला. चला, तो शिवाजी इथं येण्याच्या अगोदर याचा कडेलोट करूं.

**बा. मोहिते** : छे! कड्यापर्यंत नेण्याचे श्रम कशाला? इथल्या इथं याचा तरी शिरच्छेद करून त्या शिरजोर झालेल्या कार्ट्यांकडं याचं शीर पाठवितों; त्याशिवाय त्याचे डोळे उघडणार नाहींत. चल घे देवाचं नांव.

**तुराजी** : माझा आणि माझ्या महाराष्ट्राचा देव एकच आहे. त्या पुण्यपुरुषाचं नांव घेतांच मायभूमीचे सुपुत्र प्राणाचीहि पर्वा न करतां स्वातंत्र्यसंगरांत उडी घ्यायला हिरीरीनं तयार होतील आणि तुमच्यासारखे देशद्रोही कृष्णसर्प आपला जीव घेऊन बिळांत जाऊन दडून बसतील ! याची प्रचीति प्रत्यक्ष पहावयाची असेल तर पहा.

**बा. मोहिते** : तें मी पहाण्यापूर्वीं तूं ज्या देवाचं नांव घेणार–त्योचकडचे धडापासून वेगळं केलेलं तुझं शीर पहायला पाठवितों. चल घे तुझ्या त्या देवाचं नांव. [ तलवार उगारतो

**तुराजी** : शिवाजीमहाराज की जय !

[ आपल्या लोकांसह शिवाजी येऊन मोहिते व लाडोजीस गिरफदार करतात

**शिवाजी** : जातगोत विसरून केवळ स्वार्थासाठीं जे देशद्रोही असल्या अत्याचाराला प्रवृत्त होतात, त्याच ठिकाणीं जशास तसं या न्यायानं, त्यांच्या कर्माची फळ भोगायला लावलीं पाहिजेत. हं ! मामासाहेब, घ्या देवाचं नांव.

[ तरवार उगारतो

**लाडोजी** : ए ! शिवाजी ! तूं आपल्याला धर्मावतार म्हणवितोस आणि प्रत्यक्ष मामाला मारण्याचा धडधडीत अधर्म करतोस ! एवढंही समजूं नये तुला ?

**शिवाजी** : होय, हे माझे मामा आहेत खरे, पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, ते शकुनी मामा आहेत ! कंस मामा आहेत ! मामासाहेब, तुम्ही कसेही असला

तरी वडिलाप्रमाणें मला आपण पूज्यच आहांत. तेव्हां तुम्हांला वंदन करणं हा माझा धर्म आहे [पाया पडतो] आतां राष्ट्रधर्माला जागणारा हा शिवाजी, तुमच्यासारख्या देशद्रोही अवलादीचा नायनाट करण्याचं कर्तव्यकर्म पार पाडायला मोकळा आहे. चला घ्या देवाचं नांव. [तरवार उगारतो

**तुराजी** : रामराम म्हटलं मामासाहेब. माझ्या हाकेसरशीं माझा देव येऊन, त्यानं मला सोडविलेलं तुम्हाला पहायला मिळालं! पण तुम्ही आतां कितीहि शंख केलांत, तरी तो तुमचा देव, विजापुराहून तुम्हाला सोडवायला आलेला, आम्हाला कधींच पहायला मिळणार नाहीं.

**बा. मोहिते** : तुराजी, खरं आहे तुझं म्हणणं! तूं घातलेल्या या अंजनानं माझे डोळे आतां उघडले. घरच्या देवाला विसरून, परक्या देवाकडे पहाणाऱ्या या स्वजनद्रोही मोहित्याचे, आतां डोळे उघडले. राष्ट्रधर्मास जागणाऱ्या बा शिवबा, माझ्यासारख्या देशद्रोह्याचा नायनाट करण्यासाठीं, त्याच्या मानेवर तलवार चालवायला बिलकूल मागपुढं पाहूं नको. हा महापातकी मोहिते, मरणाची शिक्षा भोगायला तयार आहे. घरच्याच देवाचं नांव घेत आनंदानं प्राण सोडीन.

**शिवाजी** : पश्चात्ताप पावलेल्या आमच्या मामासाहेबांना शिक्षा देणार, पण ती तरवारीची नाहीं, तर ही अशा प्रेमाची.

[शिवाजी मोहित्यास मिठी मारतो. सर्व 'शिवाजीमहाराज की जय' असा जयजयकार करतात व जरीपटक्यास वंदन करतात.

हा झेंडा आपला, रंगरंगे शोभला, बालशिवाजी हातामाजी,
मर्द गड्यांना लाभला ॥ आपला ॥ ध्रु० ॥

भव्य किल्ला तोरणा, लोचना करि पारणा ॥
मावळखोरीं शंभुच पसरी, स्वातंत्र्याच्या स्फूर्तिला ॥१॥
गो – विप्र – पालनाला, दुर्जनांच्या शासनाला ॥
हा मतवाला सादर झाला, भाव दुबळा लोपला ॥२॥

— समाप्त —